ॐ नमो भगवते वासुदेवाय.

# संन्याशाचा संसार.

## गद्य-पद्यात्मक नाटक.





लेखक व प्रकाशक.

**भार्गवराम विठ्ठल वरेरकर.**

कुंजविहारी, हाच मुलाचा बाप, नरकेसरी, रंकांचें वैभव, लढाईनंतर, सत्तेचे गुलाम, इत्यादि नाटकांचा कर्ता.



**सोल एजंट—एम्. व्ही. आगाशे.**

बुकसेलर व पब्लिशर, पुणें सिटी.





( सन १९२० )

**किंमत १ रुपया.**




एकोणीसशें एकोणीस सालाच्या अखेरच्या आठवड्यांत

—अमृतसरस्तटाकीं—

**भारतवर्षीय राष्ट्रीय सभेच्या मंडपद्वारीं**

भारतवर्षाच्या प्रतिनिधींच्या स्वागतार्थ सिद्ध झालेले सिद्धपुरुष

आणि

राष्ट्रीय सभेच्या आरंभाच्या शुभप्रसंगीं भारतवर्षाच्या

उच्चतम व्यासपीठावरून

'संन्याशाचा संसार' पुकारणारे

**स्वामी श्रीश्रद्धानंदजी**

यांच्या चरणीं समर्पण.

श्रीचरणांकित.

**भार्गवराम विठ्ठल वरेरकर.**

# आभार.

तारीख पंचवीस सप्टेंबर एकोणीसशें एकोणीस गुरुवार रोजीं रात्रौ मुंबई मुक्कामीं व्हिक्टोरिया थिएटरांत ललितकलादर्श नाटक मंडळीकडून प्रस्तुत नाटकाचा पहिला प्रयोग झाला. त्यावेळीं काम करणारांचीं नांवनिशी येणप्रमाणें:—

| | |
|---|---|
| बिंदुमाधव. | रा. यशवंत विठ्ठल पिंगळे. |
| श्री. | रा. महादेव बाळकृष्ण वालावलकर. |
| डेव्हिड. | रा. केशव विठ्ठल भोंसले. |
| किशोरी. | रा. व्यंकटेश बळवंत पेंढारकर. |
| सुब्रह्मण्य. | रा. श्रीपाद विष्णु जोशी. |
| दुलारी. | रा. रामचंद्र कुशाबा गुळवणी. |
| गुलेल्लू. | रा. दत्तात्रय नारायण कुळकर्णी |
| मालन. | रा. रघुनाथ अण्णाजी इनामदार. |
| पुट्टू. | रा. गोपाळ वासुदेव गुत्तीकर. |
| ममता. | रा. रघुनाथ गोविंद शितूत. |
| शास्त्री वगैरे | रा. नारायण गणेश विजापुरकर, रा. पांडुरंग बापूजी रेगे, रा. श्रीधर महादेव देशमुख, बाळकृष्ण व तुकाराम बाबु धारगळकर, शंकर नारायण जोशी, रामचंद्र गणपत जाधव वगैरे. |




स्टेज मॅनेजर— { रा. दत्तात्रय गणेश सोहनी.
रा. बाळकृष्ण मोरेश्वर जोशी.

पेटीवाले— { रा. मारुती रामचंद्र पोवार.
रा. दत्तात्रय गोपाळ जोशी.

तबलजी— { रा. बळवंत दादा रुकडीकर.
रा. यशवंत रामजी शिंदे.

पेंटर—रा. पांडुरंग श्रीरंग हळदणकर.

मॅनेजर—रा. केशव रामकृष्ण शितूत.

या सर्व सद्गृहस्थांनीं आपआपलीं कामें अत्यंत परिश्रमपूर्वक करून प्रयोग यशस्वी केला, याजबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

सकृद्दर्शनीं सार्वत्रिक लोकप्रियतेची शंका उत्पन्न करणाऱ्या पतितपरावर्तनासारख्या विषयावरील नाटक हातीं घेऊन, अनुरूप साजसजा आणि वेषभूषणें यांची माझ्या इच्छेनुरूप जोड देण्याकरितां भरपूर व्यय करून नाटक सुंदरस्वरूपांत रंगभूमीवर आणून यशस्वी केलें व स्वतः नाट्य प्रसंगांची निवड करून फोटो काढून दिले याजबद्दल ललितकलादर्श नाटक कंपनीचे मालक सुप्रसिद्ध नट रा. केशवराव भोंसले यांचा मी फार आभारी आहें.

संदेश, इंदुप्रकाश व हिंदु मिशनरी या पत्रांनीं आपले स्पेशल अंक काढून मला ऋणायित करून ठेविलें आहे. मुंबई व पुणें येथील प्रेक्षकवर्गाच्या गोड ऋणांतून तर मी केव्हांही मुक्त होऊं इच्छित नाहीं.

प्रस्तुत नाटक लिहून रंगभूमीवर आणलें जात असतांना माझे मित्र रा. यशवंत नारायण टिपणीस, रा. विश्वनाथ गोपाळ शेट्ये, रा. विश्वनाथपंत थत्ते, रा. मनसुखराम आनंद धुमे, रा. पुरुषोत्तमराव जयवंत, रा. बळवंतराव पेंडसे, रा. व्यंकटराव पेंढारकर, रा. एकनाथ नारायण वाड, रा. आत्माराम धोंडो कापडी प्रभृति मित्रांनीं मला जें परोपरीनें सहाय्य केलें, त्याजबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

इंदुप्रकाश प्रेसचे मालक रा. दामोदरशेट यंदे यांनीं आपल्या स्वभावसिद्ध प्रेमळपणानें या पुस्तकाच्या मुद्रणाचें काम निस्वार्थतेनें करून दिलें; म्हणूनच आज हें पुस्तक प्रसिद्ध केलें जात आहे. फोटोचे ब्लॉक अशाच रीतीनें करून देणारे मनोरंजन प्रेसचे मालक रा. मित्र यांचाही मी फार आभारी आहें.

प्रस्तुत नाटकांत पुट्टूपंडिताचें काम करणारे नट रा. गोपाळराव गुत्तीकर या ब्राह्मण गृहस्थांचा श्रीमती सुंदराबाई चुटेकर या मराठा मुलीशीं हिंदु-मिशनरी संस्थेच्या विद्यमानें हें नाटक रंगभूमीवर आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं मिश्रविवाह झाला, ही गोष्ट येथें स्मरणार्थ नमूद केल्यास अस्थानीं होणार नाहीं.

पार्वतीबाईची वाडी, माहीम.
तारीख १ मे १९२०.

**भार्गवराम विठ्ठल वरेरकर.**

ॐनमो भगवते वासुदेवाय.

# संन्याशाचा संसार.

नान्दी.

(हर हर शिव)

जय जय नरसुंदर नरेंद्र गुरुवरा ।
धर्म-धरा-क्षितिजिं सत्वांशु उदितकर ॥ धृ ॥
स्वधर्माभिमानी, विधर्म सम गणी ।
जगीं समता मांडी सुधीर ॥ १ ॥

(जैजै जगजीवन)

आला उदया रवि नटवर कलियुगांत ।
खलमति करित शांत ॥ धृ ॥
जो हर उदासीन हरिच्या ध्यानिं रमे ।
तो धरि मनुजवेष जगतीं या विरमे ।
पूर्वा पश्चिमा सहरखें मिळाया ॥ १ ॥

---

## अंक पहिला.

स्थळ—नीलाचल मठ.

(प्रवेश पहिला.)

(सुब्रह्मण्य शास्त्री व बिंदुमाधव शास्त्री.)

**बिंदुमाधव.** जुनी पिढी आपल्या जुन्या समजुती झुगारून द्यायला तयार झाली असतांही, नव्या पिढींतील तरुण लोक मनाची अनुदारता दाखवूं लागले आहेत हें कशाचं लक्षण बरं?

**सुब्रह्मण्य.** हें तरुण पिढीच्या जुनेपणाचं लक्षण. बिंदुमाधवजी, समाधिस्त श्रींच्या हातून असला अत्याचार होईल असं आम्हांला केव्हांही वाटलं नव्हतं. एका अनाथ मुलाच्या शिक्षणाचा खर्च संस्थानांतून चालविला जातांना तेंच मूल पुढं श्रींच्या गादीवर बसेल अशी शंका सुद्धां आपल्या मनांत आली नाहीं; आणि शेवटीं श्रींनीं आपली गादी भ्रष्ट करण्याकरितां आंग्ल विश्वविद्यालयाची शेवटची परिक्षा देणाऱ्या त्यागराज अय्यरला आपल्या गादीवर बसविलं. समाधि घेतांना श्रींचें मस्तक ठिकाणावर होतं ना ?

**बिंदुमाधव.** हा प्रश्न विचारतांना मात्र तुमचं मस्तक ठिकाणावर नाहीं खास. अहो सुब्रह्मण्य शास्त्री, श्रींच्या दूरदृष्टीचा तुम्हांला पूर्ण परिचय होता ना ? एवढ्या चाळीस वर्षांच्या कारकीर्दींत श्रींच्या हातून किती चुका झालेल्या तुम्हीं पाहिल्या आणि ऐकिल्या ? मला वाटतं त्यागराजाच्या मत्सरामुळंच तुमच्या तोंडून असे उद्गार निघत असले पाहिजेत.

**सुब्रह्मण्य.** त्यागराजाविषयीं मला मत्सर वाटणं साहजिकच आहे. आज जी गादी त्याच्या स्थापनेनं भ्रष्ट झाली आहे तिजवर खरा अधिकार माझा होता. कशाही कारणानं कां असेना—पण तो गेला आणि त्याबरोबरच मीही गेलों असतों—

**बिंदुमाधव.** तुम्हीं जाणं मुळींच इष्ट नव्हतं. तुमच्या जाण्यानं नीलाचलपीठाचं फारच मोठं नुकसान झालं असतं. नवीन शंकराचार्यांना समवयस्कच सर्वाधिकारी पाहिजे होता.

**सुब्रह्मण्य.** आणि म्हणूनच तुम्हीं ती जागा नाकारली वाटतं. छे; छे; एवढ्याच कारणासाठीं जर तुम्हीं ती जागा नाकारली असेल तर तुम्हींच माझं नुकसान करण्यास कारणीभूत झालांत असं म्हणावं लागेल.

**बिंदुमाधव.** सर्वाधिकारी होण्यांत नुकसान ? तें कसं काय ?

योजना केली आहे. किशोरीच्या स्वर्गीय प्रेमावरसुद्धां लाथ मारून या गादीवर जो मी पाय ठेवला तो तुझ्यासारखे खिस्ती हिंदु व्हावेत म्हणूनच. डेव्हिड, किशोरीला तूं पाहिलं नाहींस. तिला पाहिलं असतंस तर तुझं देखील तिच्यावर प्रेम जडलं असतं. किशोरी म्हणजे प्रेमाची किशोर-मूर्ति आहे. मी संन्यास घेऊं नये, यासाठीं पहिल्यापासून बिंदुमाधव गुरू-जींकडे तिनं केवढा वितंडवाद चालवावा, त्यानीं तिची परोपरीनं कशी समजूत घालावी, त्यागाच्या समर्थनासाठीं मीही किती प्रमाणं दाखवावीं, पण त्या प्रेमाच्या मूर्तीचं कधींही समाधान होऊं नये. त्या कालाची आठवण होतांच अजूनही माझ्या हृदयाला थरकांप सुटतो. त्या प्रेमस्व-रूप बालिकेच्या सुकुमार प्रेमावर माझ्या संन्यासामुळं जो वज्राघात होणार आहे त्याची कल्पना येतांच मी कासावीस होऊं लागतों. डेव्हिड, एवढा हा स्वार्थत्याग करून ज्या गादीवर मी बसलों, ती गादी—त्या गादीची परं-परा-तुझ्या परावर्तनाच्या आड येऊं लागली तर पुरुषार्थाचा प्रभाव तो काय राहिला ? भिऊं नकोस, तूं हिंदू झालेला पाहिल्याखेरीज मी हा देह सोडणार नाहीं.

डेव्हिड. हिंदु ? नुसता हिंदु ? नाहीं—त्यागराज, मी ब्राह्मण आहें. मी महाराष्ट्रीय कोकणस्थ ब्राह्मण आहें. मी ब्राह्मण आहें; म्हणूनच मला ब्राह्मण झालं पाहिजे. नाहींतर आर्यसमाज मला मोकळा होता, ब्राह्मोसमा-जानंही मला दूर लोटलं नसतं. पण मला माझं ब्राह्मणत्व पाहिजे आहे. नुसता हिंदु झाल्यानं माझं समाधान होणार नाहीं. हिंदू काय व्हायचं ? मी हिंदू आहेंच. हिंदुस्थानांत जन्म घेतलेली प्रत्येक व्यक्ती—मग ती वाटेल त्या धर्माची कां असेना—ती हिंदू आहेच आहे. तिचं परावर्तन करूं म्हणणं म्हणजे सूर्याला दिवटी दाखविण्यासारखं आहे.

श्री० तुझं म्हणणं अक्षरशः खरं आहे. तूं ब्राह्मणच आहेस. तुझीं मातापितरंही ब्राह्मणच होतीं. ब्राह्मणत्वाला विहित असंच त्यांचं आचरण

होतं. तुझं आचरणही तसंच आहे. तूं ब्राह्मणच आहेस, असं हा नीलाचलपीठाचा शंकराचार्य तुला मुक्तकंठानं सांगत आहे. ( किशोरी येते ).

**किशोरी.** नीलाचलपीठाचा शंकराचार्य? अहो नीलाचल पीठाचे शंकराचार्य, पूर्वींचं आसन आपण विसरलांत वाटतं?

**श्री०** नाहीं. किशोरी, तेंही मी विसरलों नाहीं.

**डेव्हिड.** अं! हीच किशोरी?

**श्री०** डेव्हिड, तूं दचकलास कां? किशोरी ती हीच.

**किशोरी.** अजून किशोरीची ओळख आहे तर? त्यागराज, आपण आज हे कुठं बसलां आहांत?

**श्री०** हें शंकराचार्यांचं सिंहासन आहे.

**किशोरी.** किशोरीच्या हृदयसिंहासनापेक्षां हें शंकराचार्यांचं सिंहासन जास्त महत्वाचं आहे तर! त्यागराज, तुमच्या मस्तकावर हें काय आहे?

**श्री०** हा शंकराचार्यांचा मुकुट आहे.

**किशोरी.** किशोरीच्या प्रेमाच्या हिऱ्यापेक्षां जास्त मूल्यवान् हिरे त्या मुकुटांत खचले आहेत वाटतं? हें महावस्त्र देखील शंकराचार्यांचंच वाटतं? खरंच, किशोरीच्या बाहुपाशापेक्षां हा सोन्याच्या तंतूंनीं विणलेला गळफास फारच मृदु असला पाहिजे.

**डेव्हिड.** त्यागराज, मी येतों आतां.

**श्री०** बरं तर. पण डेव्हिड, थोडा वेळ थांबलास तर नाहीं कां चालणार?

**डेव्हिड.** छेः छेः; आतां मला गेलंच पाहिजे. उशीर झाला तर मिशनहाऊसचे दरवाजे बंद होतील. रेव्हरंड जोसेफ गुलेलूसाहेबांची शिस्त फार कडक आहे.



श्री—बस्स. हा अधिकाराचा अतिक्रम बस्स झाला.

पान ११

The Manoranjan Press, Bombay.



सुब्रह्मण्य—मी तुझ्या प्रेमाचा दास.

पान २४

कपाळावरील भस्माचे पट्टे, गळ्यांतील रुद्राक्षांच्या माळा, मुखांतील अखंड वेदघोष दिसून येतांच काळ्याकुट्ट हृदयाला भरगच्च शाल-जोडीखालीं झांकणाऱ्या एखाद्या नीतिभ्रष्ट पंडिताला पुराणकालीन ऋषींचा अवतार म्हणावं लागेल; आणि समाजसेवेसाठीं किंवा देशकार्यासाठीं पूर्ण स्वार्थत्याग करणाऱ्या आंग्लवेषधाऱ्याला अगर प्रत्यक्ष एखाद्या आंग्लालाही अपमानित करणं भाग पडेल. असंच ना ?

**सुब्रह्मण्य.** दोन्ही पोषाखांत दोन्ही भिन्न स्वभावाचे लोक असतात. नाहीं असं नाही. पण पोषाखानंच काय बिघडतं ? जुना पोषाख सर्वच ठिकाणीं अनीतिमत्तेचा द्योतक नसतो !

**बिंदुमाधव.** मीही तेंच म्हणतों. पोषाखानंच काय बिघडतं ? नवी चाल कांहीं सारीच भ्रष्टाकाराची निदर्शक नसते ! त्यांतूनही संन्याशाला कसलंच बंधन नाहीं. त्यानं अमूकच पोषाख वापरावा आणि अमुकच वापरूं नये असा निर्बंध घालतां येणार नाहीं. अनादिकाळापासून संन्याशाचा वेष कांहीं एकाच स्वरूपाचा राहिलेला नाहीं. काल बदलत आहे, तशी चालही बदलत आहे. त्यांत फक्त राष्ट्रीयत्व घालविलं नाहीं म्हणजे झालं.

**सुब्रह्मण्य.** आधीं परंपरा कायम राखली पाहिजे. परंपरेच्या स्थायित्वा-साठीं केव्हां केव्हां बऱ्यालाही वाईट म्हणावं लागणार. ( दुलारी येते )

**दुलारी.** परंपरेच्या स्थायित्वासाठीं श्रींनीं मात्र आज भलतंच कांहीं तरी केलं.

**सुब्रह्मण्य.** कोण ? दुलारी ? तूं इकडे मठांत कुणीकडे ?

**दुलारी.** मी ? मी आतां मठांत कां येऊं नये ? श्रींनी आजपासून मठाचं द्वार सर्वत्रांना मोकळं केल्याची घोषणा फिरविली आहे.

**सुब्रह्मण्य.** केव्हांची ही घोषणा ? आणि दिली तरी कुठं ? श्री या-वेळीं तर मठांत नाहींत. मघाच ते नदीतटाकीं सायंस्नानासाठीं गेले आहेत.

**दुलारी.** स्नान करून परत येतांना एका अतिशूद्राच्या घरीं श्रींनीं हा हुकूम सोडला.

**सुब्रह्मण्य.** काय म्हणतेस ? अतिशूद्राच्या घरीं ?

**दुलारी.** होय बरं. अतिशूद्राच्या घरीं पाद्यपूजेला गेल्यावेळींच त्यानीं असं सांगितलं. इतक्यांतच ते इथं येतील. त्यावेळीं डेव्हिडलाच विचारा सारी हकिकत.

**सुब्रह्मण्य.** डेव्हिड श्रींच्या बरोबर ? काय म्हणतेस दुलारी ? आणि तो त्यांजबरोबर या मठांत येत आहे ? नाहीं—मी त्याला या मठाची पायरी चढूं देणार नाहीं. आचार्यांचं पवित्र स्थान विधर्मीयाच्या स्पर्शानं मी भ्रष्ट होऊं देणार नाहीं.

**बिंदुमाधव.** काय म्हटलंस दुलारी, श्रीनीं अतिशूद्राकडून पाद्यपूजा घेतली ? हं ! एकंदरीत कार्याला प्रारंभ करण्याचं धाडस आज योग्यवेळीं योग्य जागींच झालं, यांत कांहीं शंका नाहीं.

**सुब्रह्मण्य.** योग्य वेळीं ? योग्य जागीं ? खरंच, हीं संध्याकाळची राक्षसी वेळा धर्मभ्रष्टतेच्या अधिवेशनाला अनुरूपच आहे. त्यांतूनही अतिशूद्राच्या घरीं ! वाः ! आज शंकराचार्यांच्या पवित्र पीठाचा उद्धार झाला खरा !

**दुलारी.** अगदीं हेच उद्गार श्रीनीं त्यावेळीं काढले.

**सुब्रह्मण्य.** म्हणजे ? धर्मभ्रष्टतेचा उल्लेख करून त्यांनीं अशी घोषणा केली काय ?

**दुलारी.** तेवढा शब्द मात्र बदलला होता खरा. ते म्हणाले—

पद. (थारो भरोसो मने भारी —या चालीवर.)

रूढी विनाशी उषा आली । ही आतां । कीं सविता हा ये निशिकालीं ॥ धृ ॥
या बालभारता । संन्यासी व्हावा त्राता । विपदमया जनजालीं ॥ १ ॥

**बिंदुमाधव.** ही पहा श्रींचीच स्वारी इकडे येत आहे-( श्री, डेव्हिड व इतर शास्त्रीमंडळी लवाजम्यासह प्रवेश करितात. ) नीलाचल पीठाचा विजय असो.

**श्री.** तथास्तु. पाहिलंस डेव्हिड, आजच्या आरंभिलेल्या कार्याला गुरूजींकडून हा अनाहुत आशीर्वाद मिळाला.

**बिंदुमाधव.** हा आशीर्वाद अनाहुत नाहीं. पाद्यपूजेची सर्व हकिकत दुलारीनं आतांच आम्हांला सांगितली.

**श्री.** गुरूजींची अनुमति मला शिरसा वंद्य आहे; पण सुब्रह्मण्य, तुम्हीं उगी कां? नीलाचलपीठाचे सर्वाधिकारी पीठावर रुष्ट तर झाले नाहींत ना?

**सुब्रह्मण्य.** मर्यादेचा अतिक्रम होत असेल तर श्रींनीं त्याची क्षमा करावी. पण एक प्रश्न विचारायचा आहे. हा विधर्मी आचार्यांच्या मठांत कसा आला? सर्वांना मुक्तद्वार करतांना श्रींनीं विधर्मीयांच्या सहवासानं आम्हांलाही भ्रष्ट करण्याची योजना केली आहे का?

**श्री.** विधर्मी? कोण विधर्मी? या सर्व मंडळींत मला तरी कुणी विधर्मी दिसत नाहीं.

**सुब्रह्मण्य.** कुणीही विधर्मी दिसत नाहीं? अस्सं. अतिशूद्राकडून पाद्यपूजा घेऊन येतांना श्रींनींही धर्मांतर केलं वाटतं!

**श्री.** माझं धर्मांतर एकदांच झालं आहे. आतां मला पुनः धर्मांतर करण्याची जरूरी राहिली नाहीं. संन्यास घेतांना ज्यावेळीं स्वतःचं श्राद्ध करून मी माझ्याच पायावर पिंडदान केलं, त्याच वेळीं माझीं धर्मबंधनं तुटून गेलीं, सर्वधर्मांचा मी झालों, सर्व धर्म माझे झाले, त्याच वेळीं सर्वधर्मीयही माझ्याच धर्मांचे बनले.

**सुब्रह्मण्य.** हें नुसतं लपंडावाचं भाषण आहे. ( डेव्हिडकडे बोट दाखवून ) हा-हा विधर्मी या मठांत कां आला?

**श्री.** कोण ? हा ? हा विधर्मी कसा ? याच्या, माझ्या किंवा तुमच्या धर्मांत मुळींच भिन्नभाव नाहीं. हा जसा जन्माला आला, तसेंच तुम्हीं आणि मी जन्मलों. याला जगण्यासाठीं जसं अन्न पाहिजे, तसंच तुम्हांला आणि मलाही अन्नच जगवितें. याला जसं मरण येणार, तसाच मरण्याचा धर्म तुमच्या आणि माझ्या ठायींही आहे. मग सुब्रह्मण्य, हा विधर्मी कसा ?

**सुब्रह्मण्य.** हा ख्रिस्ती आहे.

**श्री.** ख्रिस्ती मनुष्य नव्हे काय ? ख्रिस्त्याला मन नाहीं का ? बुद्धि नाहीं का ? अहंकार नाहीं का ? मानवधर्माचा कोणता अंश तुमच्यापेक्षां याच्याठायीं कमी आहे तें मला सांगा पाहूं ?

**सुब्रह्मण्य.** कां बरं ? हा ख्रिस्ताचा अनुयायी आहे.

**बिंदुमाधव.** आणि आम्हीं कृष्णाचे अनुयायी आहोंत. भेद काय तो फक्त नांवाचा. असंच ना ?

**श्री.** बोला सुब्रह्मण्य, हा मनुष्यच आहे ना ?

**दुलारी.** आणि तुम्हींही मनुष्यच आहांत.ना ?

**सुब्रह्मण्य.** होय. मी मनुष्यच आहें आणि हाही मनुष्यच आहे. पण मी हिंदू आहें आणि हा बाट्या

**श्री.** हं—खबरदार. धर्मविद्वेषाचं वेड पसरविणारे असले शब्द आतां बंदच झाले पाहिजेत. निदान माझ्या सर्वाधिकाऱ्यांच्या तोंडीं तरी ते येतां कामा नयेत. सुब्रह्मण्य, हा दुराग्रह सोडण्याचा काल आतां आला आहे असं नाहीं का तुम्हाला वाटत ? दिवसेंदिवस कमी होणारं आमचं संख्याबल भरून काढण्याकरितां तरी आम्हीं ज्यास्त उदारपणा दाखविला पाहिजे. ते दिवस आतां जात चालले आहेत. कारण –

पद (उदतन धिताले तनों या चालीवर.)

अविरत जगतिं फिरे कालमान। शशि रवि तारकाहि। अडवि त्यांतें कोणी एसा नाहीं ॥ ध्रु.॥ सदवनासि सदभिमान दे उगम धी निगम। सज्जनमन दुर्जनगण धिक्कारित, जग सन्मानि– शांत–दान्त व्हाया ॥ १ ॥

डेव्हिड. उदारता किंवा अनुदारता बाजूला ठेविली तरी माझ्या-सारख्या निष्कारण बहिष्कृत झालेल्या व्यक्तीची अनुकंपा तरी आली पाहिजे. मी ख्रिस्ती आहें हा कांहीं माझा अपराध नाहीं. मी अजून ब्राह्मण झालों नाहीं, याजबद्दल मात्र कोण जबाबदार आहेत हें तुम्हींच पहा. कारण—

पद–(दारादीं दारादीं–या चालीवर)

विटला या जगा विफलाश परधामिं। निजलोक सहवास मुकला स्वानुगामि ॥ ध्रु.॥ निजधर्म निजनाम। फिरुनि वरि स्वधाम। स्वजनिं रति तयासि अनुताप सानुकामिं ॥ १ ॥

सुब्रह्मण्य. सर्वांनाच हल्लीं ब्राह्मण व्हावंसं वाटतं; पण ब्राह्मण होणं कांहीं सोपं नाहीं.

दुलारी. विश्वामित्रासारख्या एका कट्ट्या क्षत्रियाला तें साध्य झालं होतं.

सुब्रह्मण्य. सारेच कांहीं विश्वामित्र नाहींत. विश्वामित्राचं नांव घेणं सोपं आहे, तितकं विश्वामित्र होणं सोपं नाहीं. म्हणे विश्वामित्र! विश्वामित्राच्या काळांत बायकासुद्धां तुझ्यासारख्या धर्मकार्यांत लुडबुडत नव्हत्या. त्यावेळीं—

दुलारी. मग गार्गी, मैत्रेयी, सुलभा, कात्यायनी, केव्हांच्या आणि कोण? सुब्रह्मण्य, तुम्हां पुरुषांची ही शेखी फुकट आहे. हिंदुधर्माला आम्हीं बायकांनींच जगविलं आहे आणि आतां त्यांत क्रांतिही आम्हीं बायकाच करूं.

**डेव्हिड.** माझ्या परावर्तनाला कारणीभूत होणारी कुणीही व्यक्ति असली तरी मला ती प्रियच वाटणार. मग ती स्त्री असो— पुरुष असो, स्वधर्मी असो–विधर्मी असो, स्वदेशी असो किंवा विदेशी असो, मला ती सारखीच वंद्य होईल.

**सुब्रह्मण्य.** हिंदुधर्मांची परंपरा निर्मळ आणि निर्भेळ राखण्याकरितां आम्हीं कुडींत प्राण असेपर्यंत शंकराचार्यांना सुद्धां बेदरकार आडवे जाऊं.

**श्री.** हिंदुधर्मांची परंपरा निर्मळ राहावी, हाच उद्देश प्रत्ये-कानें–शंकराचार्यांनंसुद्धां नित्य मनांत वागविला पाहिजे; आणि त्याच उद्देशाच्या समर्थनासाठीं या मठाचा दरवाजा आज सर्वांना मोकळा ठेव-ण्यांत आला आहे.

**सुब्रह्मण्य.** विधर्मीयानां सुद्धां काय ?

**श्री.** साऱ्या मानवसमाजाला इथं मुक्तद्वार आहे.

**सुब्रह्मण्य.** नाहीं. या घोषणेला मी प्रतिबंध करणार. डेव्हिड, आतांच्या आतां तूं इथून बाहेर गेलं पाहिजेस.

**बिंदुमाधव.** सुब्रह्मण्य, हा श्रींचा उपमर्द होत आहे.

**सुब्रह्मण्य.** ग-ची बाधा झालेल्या धर्मभ्रष्ट श्रींना न जुमानण्याची मीही आजपासून प्रतिज्ञा करीत आहें.

**बिंदुमाधव.** हं–हं–सुब्रह्मण्य, बोलण्यापूर्वी कांहीं विचार करा.

**सुब्रह्मण्य.** पूर्ण विचारा अंतींच मी बोलायला प्रारंभ केला आहे. ज्यावेळीं श्रींनीं पूर्वपरंपरा सोडून बंगाली संन्याश्याचं अनुकरण करून आपला वेष जमविला त्याचवेळीं माझे डोळे उघडले पाहिजे होते. त्यावेळीं केलेल्या चुकीचा परिणाम मला आज भोगावा लागला. स्वतःच्या मनाविरुद्ध आज प्रत्यक्ष श्रींचा मला चारचौघांत अपमान करणं भाग पडलं आणि आतांही जर मी स्वस्थ राहीलों तर पुढं याहीपेक्षां भयंकर

अत्याचार करणं मला अपरिहार्य होईल. डेव्हिड, मठाच्या बाहेर हो. बिंदुमाधवजी, उद्यांच्या सूर्योदयापूर्वीं मठभूमीच्या शुद्धीकरणाची व्यवस्था झाली पाहिजे.

**श्री.** ये डेव्हिड. इथं माझ्या शेजारीं बैस.

**सुब्रह्मण्य.** डेव्हिड, आधीं मठाबाहेर हो.

**श्री.** डेव्हिड मठाबाहेर जाणार नाहीं. त्याला मी बोलावून आणलं आहे आणि माझ्या अनुमतीशिवाय त्याला मी इथून जाऊं देणार नाहीं.

**सुब्रह्मण्य.** नाहीं—हा उपमर्द मी सहन करणार नाहीं बाट्यांना उराशीं कवटाळून धरून शंकराचार्य जरी बुडूं लागले तरी त्यांचा सर्वाधिकारी त्यांना तारण्यासाठीं, या बाट्याला धरून असा खेंचून— ( डेव्हिडचा हात धरतो ).

**श्री.** बस्स. हा अधिकाराचा अतिक्रम बस्स झाला. या मठांत सर्वाधिकारी अजून शंकराचार्यांच्या मुकुटावर बसले नाहींत आणि यापुढंही बसणार नाहींत.

**सुब्रह्मण्य.** तर मग असल्या भ्रष्ट झालेल्या गादीचं सर्वाधिकारित्व हा सुब्रह्मण्य असं झुगारून जाणार. ( जातो ).

**श्री.** गुरूजी, आपणच आतां त्यांची जरा समजूत घाला. दुलारी, तूंही जाऊन त्यांना चार शब्द सांग. इतर कुणांपेक्षांहि तुझ्या शब्दाला ते जास्त महत्त्व देतील. ( दोघे जातात. )

**डेव्हिड.** मला वाटतं, मी आतां जावं हेंच बरं.

**श्री.** कां बरं?

**डेव्हिड.** आपल्या संस्थानच्या व्यवहारांत माझ्यामुळं निष्कारण भेद होऊं पहात आहे, याचं मला फार वाईट वाटतं. सर्व बाजूनं मी बहिष्कृत झालोंच आहे, मग माझ्यासाठीं इतरांना तरी कष्ट कां व्हावे ?

श्री. छेः छेः असं म्हणू नकोस. तुझ्या परावर्तनासाठीं मला ही शंकराचार्यांची गादी सोडावी लागली तरीही ती मी मोठ्या आनंदानं सोडीन. शंकराचार्य ही संस्था जगत्कार्यासाठीं आहे–व्यक्तिविषयक स्वार्थासाठीं नव्हे. तुझं अभीष्ट साध्य होण्यांत हिंदुस्थानचं कल्याण आहे. हिंदुधर्माचं कल्याण आहे–अखिल हिंदुमात्राच्या राष्ट्रीय भावनेचं परमावधीचं कल्याण आहे. ही गोष्ट अजून सर्वत्रांना पटली नाहीं आणि मनाची उदारता जागृत झाल्याशिवाय ती पटणार नाहीं. अशी जागृति घडवून आणणं हें माझं शंकराचार्य या नात्यानं प्रमुख कर्तव्य आहे. तें बजावण्याला मी चुकलों तर मला हा जो अकल्पित सन्मान मिळाला आहे, त्याला मी पूर्णपणें अपात्र ठरेन.

डेव्हिड. माझ्यासाठीं कुणाकुणाला किती किती कष्ट पडणार आहेत, देव जाणे! श्रींना माहितच आहे—

श्री० थांब डेव्हिड, सन्मानाच्या भडिमाराला मी इतका कंटाळून गेलों आहें कीं, एका व्यक्तिनं तरी मला एकवचनार्थी संबोधावं, अशी भयंकर तळमळ मला लागली आहे. तूं आणखी मी सहाध्यायी आहोंत. पहिल्यापासून आपण त्याचप्रमाणं एकमेकांना संबोधित आलों आहोंत. आपण समवयस्क असल्यामुळं जें नातं अजूनपर्यंत पाळीत आलों तेंच पुढं चालवीत जाऊं. भारतवर्षांतील अखिल विद्वज्जनसमूहाचा पीठाधीश शंकराचार्य डेव्हिड जोशीचा त्यागराजच राहिला पाहिजे.

डेव्हिड. नका, नका, मला स्पर्श करूं नका. मी विधर्मी आहें. त्यागराज, मी कोण आहें? खरोखर मी कोण आहें, हें अजून मला कळत नाहीं. संकटाच्या फेऱ्यांत सांपडून माझे वडील गंगाधरपंत जोशी खिस्ती झाले. ज्या आशेनं ते खिस्ती झाले ती आशा तर सफल झालीच नाहीं. सरकारी पैशाच्या अफरातफरीच्या खोट्याच आरोपावरून खिस्ती झाले, तरीही त्यांना दोन वर्षं कारागृहवास भोगावा लागला. त्यानंतर माझा

**किशोरी.** हे खिस्ती आहेत वाटतं ! मी तुम्हांला कुठं तरी पाहिलं असावं असं मला वाटतं.

**डेव्हिड.** तुम्हांला लाहोरांत पाहिल्याची माझी आठवण मात्र अगदीं निश्चल आहे.

**किशोरी.** पण तुमचा परिचय असल्याचं मला तर कांहीं आठवत नाहीं.

**डेव्हिड.** असंच असतं—

पद ( पारब्रह्म परमेसर–या चालीवर )

सानुराग गगनीं रवि । विचरे दिनिं सतत काल । अवलोकितो सकल लोक । सुखनिधान गुणवितान । सावकाश सावधान ॥ धृ० ॥
उदासीन गगनगता । तुच्छ गमति धराशायि । पूजिति नच तो विलोकी । जन अनाथ । गगननाथ । सावकाश सावधान ॥ १ ॥

**किशोरी.** (स्वगत) ह्या उद्गारांचा अर्थ काय बरं असावा ?

**डेव्हिड.** त्यागराज, येतों मी आतां. किशोरी देवी, आतां यापुढं तरी माझी नीट ओळख राहील ना ? येतों मी. (जातो)

**श्री.** किशोरी, तूं केव्हां आलीस ?

**किशोरी.** दुलारीच्या पत्रावरून मला ही हकीकत कळली. त्यागराज, तुम्हांला हृदयच नाहीं का? माझं प्रेम तुम्हांला इतकं का मातीमोल वाटलं? प्रेमाच्या संसारापेक्षां तुम्हांला वैभवाचा पसारा इतका का मोठा वाटला ?—

पद. ( ऐसी कवन लगन–या चालीवर. )

कां न करुणा । विदारी मनाला सदया ॥ धृ ॥
प्रणयपरा मला त्यागिली अशी कां बाला ।
कीं वैभवाशिं प्रेमा न दया ॥ १ ॥

**श्री.** किशोरी, तुझ्या प्रेमाची थोरवी मी कमी मानतों, असं मुळींच समजूं नकोस. तुझ्या प्रेमाच्या मार्दवाच्या बळावरच मला एवढा त्याग करण्याचं धैर्य आलं. तुझ्या प्रेमाच्या प्रपंचानंच मला विश्वाच्या संसाराचा मार्ग दाखविला. तुझ्या प्रेमाच्या ज्योतीनंच माझ्या डोळ्यांवरचं मोह-पटल दूर झालं. किशोरी, मर्यादित प्रेमाच्या मधुरत्वाचा आभास मिळाल्यामुळंच विश्वप्रेमी होण्याची स्फूर्ती माझ्या हृदयांत जागी झाली आणि तिनंच मला हा संन्यासाचा मार्ग स्वीकारायला भाग पडलं.

**किशोरी.** विश्व म्हणजे कांहीं किशोरी नव्हे.

**श्री.** किशोरीच्या हृदयांत मला विश्वाचं प्रतिबिंब दिसलं. नव्हे— किशोरीच्या हृदयांतच सारं विश्व सांठविलेलं दिसून येतांच मी किशोरीला सोडून विश्वाकडे नजर फेंकली.

**किशोरी.** सारं विश्व सामावण्याइतकं किशोरीचं हृदय जर तुम्हांला उदार वाटत होतं तर अशा हृदयांतील ओळखीच्या प्रेमापेक्षां विश्वाचं अनोळखी प्रेम तुम्हीं कां बरं स्वीकारलंत ?

**श्री.** हा विपर्यास होत आहे. एका व्यक्तीच्याठायीं प्रेम जर इतकं विराटस्वरूपांत बांधलं जातं तर विराटव्यक्तीच्या हृदयांतील प्रेम किती आकर्षक वाटेल, याचा तूंच विचार कर. किशोरी, मी कांहीं मेलों नाहीं. हा देहही कांहीं जळून भस्म झाला नाहीं. मी आहें, तसंच माझ्या विष-यींचं तुझं प्रेम किंवा तुझ्याविषयींचं माझं प्रेम जिवंत आहे. तें प्रेम इतकं अफाट आहे कीं, त्याला मर्यादित करणं म्हणजे मोठं पाप होईल. देहसां-निध्य म्हणजेच कांहीं प्रेम नव्हे ना ?

**किशोरी.** तें मला कांहींच कळत नाहीं. प्रेमानं तुमची दृष्टी व्यापक झाली असेल; पण माझी दृष्टी मात्र आहे तशीच संकुचित आहे. माझं प्रेम एवढ्याच मूर्तिपूरतं सांठविलेलं आहे आणि तें त्याबाहेर जाऊं पाहील तर असलं फोफावणारं प्रेम हृदयांतून तोडून काढून फेकून देईन.

श्री. हें म्हणणं फोल आहे. परिस्थितीच्या फिरत्या भोंवऱ्यांत गुंतलेल्या जीवानं कसलीही शेखी मिरविणं शहापणाचं होणार नाहीं. काय होईल कुणी सांगावं! ज्या परिस्थितीच्या भोवऱ्यानं मला तुझ्या प्रेमापासून खेचून ओढून संन्याशाच्या गादीवर बसविलं त्याच भोवऱ्याच्या गिरकीसरशीं तूंही संसारांत पडणार नाहींस कशावरून ?

किशोरी. माझं प्रेम इतकं दुबळं आहे, असं का तुम्हाला वाटतं ?

श्री. तुझं प्रेम दुबळं आहे, असं मी कुठं म्हटलं ? तुझं प्रेम खरोखरच मोठं बलवान् आहे; पण कालचक्राची गती त्याहूनही बलवत्तर आहे.

किशोरी. हा नुसता लपंडाव आहे. वैभवाच्या हव्यासानं अधाश्यासारखी पत्करलेली संन्याशाची जंबूकवृत्ति लपविण्याची ही केवळ हातचलाखी आहे.

श्री. किशोरी, हेंच का तुझं प्रेमाचं लक्षण ? तुझ्या प्रेमाचं स्थान इतकं का कावेबाज आहे ? तुझं प्रेम इतकं का आंधळं आहे ?

किशोरी. माझं प्रेम आंधळंच होतं, असं आतां मला वाटूं लागलं आहे. नाहींतर त्याची गती इतकी चुकीची झाली नसती.

श्री. असं जर आहे तर आतां हा विषयच संपला. आंधळ्यानं दाखविलेला मार्ग चुकीचा आहे, असं कळल्यावरही त्याच मार्गाचा अवलंब करणं, हें डोळसपणाचं लक्षण नव्हे.

किशोरी. प्रतारणा ! प्रतारणा ! नुसती प्रतारणा ! वैभवाच्या लालसेनं प्रेमाला देखील लाथाळण्याची बुद्धि होत असते. वैभवाची आवड म्हणजे अधोगतीची परिसीमा आहे.

श्री. संन्यास म्हणजे वैभव काय ?

किशोरी. संन्यास ? कसला संन्यास ! संन्याशाला सोन्याचा मुकुट कशाला ? संन्याशाला ही भरगच्च महावस्त्रं कशाला ? संन्याशाला हें सिंहासन तरी कशाला ? हे दारीं झुलणारे रुपेरी अंबारीचे हत्ती, हे

भरजरी झुलीचे घोडे, हीं उंटं, हा लवाजमा, हे भालदारचोपदार, ही दिवसा पाजळलेली दिवटी—हीं संन्याशाचीं लक्षणं वाटतं ? या हिंदुस्थानांत वाटेल त्याला राजा होतां येत नाहीं; म्हणूनच कुणी वैभवाला हपापलेल्या सडक्या मेंदूच्या आधाशानं - मला वाटतं—ही शंकराचार्यांची गादी मधेंच प्रचारांत आणली. फुकटचं राजवैभव तरी मिरवायला मिळतं ! हें काय थोडं झालं ? त्यागराज, त्यागाच्या वृथा वल्गनांनीं या किशोरीला फसवायचा प्रयत्न करण्यापूर्वी या वैभवाचा तुम्हीं त्याग केला पाहिजे होता, म्हणजे कदाचित् तुमचं म्हणणं सयुक्तिक दिसलं असतं. पण असलं जळजळित राजवैभव समोर दिसत असूनही प्रेमाची पाया मल्ली करणारानं तोंडची वाफ घालविण्यापूर्वी आपलं मन किती निरपेक्ष आहे, याचा विचार आधीं करावा.

श्री. किशोरी, तुझा उपदेश मला शिरसावंद्य आहे. पूर्वी नाहीं तर नाहीं; पण यापुढं तरी ही राजचिन्हं धारण करून मी तुझ्यासमोर येणार नाहीं.

किशोरी. माझ्यासमोर नाहीं येणार कदाचित्; पण या राजचिन्हांशिवाय जग तुम्हांला शंकराचार्य म्हणून ओळखील का ?

श्री. तेंच आतां पहायचं आहे. किशोरी मी आतां जातों-माझ्या आन्हिकाची वेळ झाली; पण माझ्या कठोर भाषणाबद्दल तूं मला क्षमा करशील ना ?

किशोरी. प्रेमाच्या साम्राज्यांत क्षमेचं छत्र सदोदित विराजमान असतं. त्यागराज, मलाही तुम्हीं क्षमा कराल ना ?

श्री. ती कसली ?

किशोरी. मी शंकराचार्यांना नमस्कार केला नाहीं.

श्री. शंकराचार्यांच्या गुरूनं शंकराचार्याला नमस्कार करण्याची आवश्यकता नाहीं. (जातो)

किशोरी. रागावले का हे ? त्यांनी कां रागाऊं नये ? मी किती कठोर बोललें ! त्यांना असं बोलण्याचा मला काय अधिकार ? प्रेमाचा अधिकार ! प्रेमाचा अधिकार ? पण माझ्या प्रेमाचा अधिकार त्यांनीं कुठं मानला ? एखाद्या बंडखोराप्रमाणं प्रेमाच्या साम्राज्यांतलि कायदे मोडून ज्यांनीं संन्यास घेतला, त्यांच्याशी मी काय म्हणून भांडावं ? बंडखोराला कायद्याची खातरजमा कुठली असणार ? विधात्या, प्रेमाचे कायदे घडवितांना असले बंडखोर पुढं निपजतील, असं तुला मुळींच का वाटलं नाहीं ? अशा बंडखोरांसाठीं तूं एखादी भयंकरशी शिक्षा मुळींच का निर्माण केली नाहींस ? स्त्रियांचं हृदय ओळखील, असा एकही पुरुष तुला मुळींच का घडवितां आला नाहीं. वेड्या विधात्या, मग हें जग तरी कां अस्तित्वांत आणलंस ? जग झालं तें झालं; पण हा संन्यास कां अस्तित्वांत आला ? कुणी आणला ? आणि वरती ही शंकराचार्यांची वंदनीय गादी कोठून आली ? आतां मी अशावेळीं काय करावं ? विधात्याच्या चुकीसाठीं मी कां दंड भोगावा ? देवा, तुला काहींच का दया नाहीं ? काय माझी स्थिती ही ! नको तें करणं नशिबीं आलं आहे. शंकराचार्यांना नाहीं; पण त्या महात्म्याच्या या गादीला तरी मला नमस्कार केला पाहिजे ना ? आतां नमस्कार कसा करूं ? या माझ्या दावेदारणीला मी नमस्कार कसा करूं ? नाहीं. वैभवाचा भरजरी बुरखा घेऊन आपल्या संन्याशी नवऱ्यापुढं चमकणाऱ्या चांडाळणी, मी तुला नमस्कार करणार नाहीं. त्यामुळं पाप लागलं तरी हरकत नाहीं. खरोखर—

पद. ( चाल. बेरन ठाडी. )

वैरिण झाली । फसवि कशी मला । चोरुनि माझ्या प्रिया
आज ही ॥ धृ ॥ जरि मज तोडी । जोडि मुकुटा शिरीं ।
अनुमत विभवीं प्रियाला । देउनि झोला । करी त्याग ही ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

---

( प्रवेश दुसरा. )

स्थळ—रस्ता.

( सुब्रह्मण्य प्रवेश करितो. )

सुब्रह्मण्य. मी चुकलों तर नाहीं ? अविचार झाला काय हा ? मुख्य विषयाचा यत्किंचितदेखील ऊहापोह न होतां पूर्वीच्या हकिकतीच्या परिणामामुळं मी नुसता चिडून निघून आलों, असंच सर्वांना वाटलं असेल. त्यागराज आतां काय करील ? बरं झालं म्हणेल, गेली एकदाची ब्याद, असंही म्हणेल. बिंदुमाधवजींना काय वाटेल ? तें कांहींच सांगता येणार नाहीं. पण—पण दुलारी काय ह्मणेल ? अरेरे! दुलारी काय म्हणेल ? दुलारी मला अविचारी म्हणेल. दुलारी मला मूर्ख म्हणेल— आत्मघातकी म्हणेल. रागानं निघून जातांना सहज माझी दृष्टी तिच्याकडे वळली. त्यावेळीं ती कशी दिसली ? रागावलेली नव्हती खास; पण हिरमुसली होती का ? दुःखी दिसली का ? कशी बरं दिसली ? अरेरे ! दुलारी आतां मला काय म्हणेल ? मी नीलाचल सोडून जाईन असंच तिला वाटलं असेल ? नाहीं. मी तिच्यापासून दूर जाणार नाहीं, हें तिला पूर्णपणें माहित आहे. मग मी अपमान सोसून याच गांवात भिक्षान्नावर पोट भरित राहिन, असं तिला वाटलं असेल का ? दुलारी— दुलारी–( दुलारी येते ).

दुलारी. काय आज्ञा आहे ?

सुब्रह्मण्य. दुलारी,—काय बोलूं आतां ? दुलारी,—तूं रागावली तर नाहींस ?

दुलारी. वल्लभाचा मानीपणा पाहून कोणती रमणी रागावेल ? मी इतकी दुबळी आहें, असं तुम्हांला वाटलं का ? एक झालेल्या दोन अंतरंगांत इतकं का भिन्नत्व राहत असतं ?

**सुब्रह्मण्य.** नाहीं. खात्रीनं भिन्नत्व नाहीं. पण दुलारी, मी अविचार केला असं तुला वाटतं का ?

**दुलारी.** तुम्हांला काय वाटतं ?

**सुब्रह्मण्य.** स्वाभिमानाच्या समर्थनासाठीं मी स्वार्थत्याग केला, असंच मला वाटतं ?

**दुलारी.** मलाही तसंच वाटतं. पण हें कसं काय झालं ?

**सुब्रह्मण्य.** स्वाभिमानाच्या जाणिवेनं—

**दुलारी.** तसं नव्हे. हें कसं काय झालं ?

**सुब्रह्मण्य.** झालं ते एका अर्थी बरंच झालं. चल दुलारी, आपण आतां आनंदानं संसार थाटून सुखाचा चरितार्थ चालवूं, चल.

**दुलारी.** वडील बहिणीचं लग्न झाल्याशिवाय ?

**सुब्रह्मण्य.** किशोरी वेडी आहे. मृगजलाच्या मागं लागून फसणाऱ्या रानांतल्या हरिणीसारखी ती प्रेमाच्या भ्रमामागं लागून हताश होणार आहे. त्यागराजाच्या संन्यासाची हकिकत कळतांच मला वाटतं ती आतां आकांतच करील.

**दुलारी.** किशोरी आली; आणि आतांच श्रींच्या दर्शनासाठीं मठांत गेली.

**सुब्रह्मण्य.** किशोरी आली ? अरेरे ! आतां काय बिचारीची स्थिति होईल ?

**दुलारी.** आतां माझी झाली आहे तशीच.

**सुब्रह्मण्य.** म्हणजे ? तूंही हताश झालीस ? ती कां ?

**दुलारी.** कां ? तुम्हींच का विचारितां आहांत हें ? हीच का माझी परीक्षा केलीत ? अहो सर्वाधिकारी—

**सुब्रह्मण्य.** नाहीं—मी आतां सर्वाधिकारी नाहीं.

**दुलारी.** तुम्हीं सर्वाधिकारीच आहांत. नीलाचलपीठाचे सर्व अधिकार अजून तुमच्याच हातीं आहेत. तुम्हांला टाकून श्रींचं कधींच चालणार नाहीं. चालेल का? मग तुह्मीं हें काय केलंत? समाधिस्थ श्रींना दिलेलं वचन असंच का पाळणार? त्यागराजाला केव्हांही अंतर देणार नाहीं, असं तुह्मींच कबूल केलं होतं ना?

**सुब्रह्मण्य.** पण त्यानींच माझा त्याग केल्यावर—

**दुलारी.** कुणी कुणाचा त्याग केला?

**सुब्रह्मण्य.** तें खरं. पण अतिशूद्राकडची पाद्यपूजा त्यांनीं कां घ्यावी?—

**दुलारी.** प्रत्यक्ष आद्यश्रीशंकराचार्यांनाही वाराणशीक्षेत्रांत एका चांडाळाकडून चांगलीच पाद्यपूजा करून घ्यावी लागली होती, हें तुम्हांला माहित आहे ना?

**सुब्रह्मण्य.** पण त्यांनीं विधर्मीयांना कांहीं कवटाळलं नव्हतं.

**दुलारी.** वेदाचं प्रामाण्य न मानणाऱ्या बौद्धांना आणि जैनांना त्या काळांत तुम्ही विधर्मीच समजत होतां ना? त्यांना संन्यास कुणी दिले? त्यांना ब्राह्मणसमाजांत कुणी घेतलं? आद्यशंकराचार्यांनींच ना? सुब्रह्मण्य, तुम्हांला त्यागराजांची योग्यता कळली नाहीं. तुम्हीं निघून गेल्यावर त्यांनीं काय केलं असेल, असं तुम्हांला वाटतं?

**सुब्रह्मण्य.** आपल्या मठांतील पदोपदीं विरोध करणारी एक व्यक्ती नाहींशी झाली; म्हणून त्यांनीं आनंद प्रदर्शित केला असेल.

**दुलारी.** वेडा मत्सर हें बोलत आहे. त्यांनींच मला तुमच्याकडे पाठविलं. यांतच काय तें समजा. हा झाला त्यांचा स्वाभिमान. आणि तुम्हीं?

**सुब्रह्मण्य.** मी?—मी तुझ्या प्रेमाचा दास. त्यागराजापेक्षां मला तुझी आज्ञा जास्त प्रमाण आहे.

दुलारी. चला तर मग. माझ्या आज्ञेनं त्यांची क्षमा मागा.

सुब्रह्मण्य. जशी तुझी आज्ञा.

दुलारी. आतां प्रेमाचा प्रकाश पडला खरा. कारण—

पद—चाल-पनघटपर हो गई.

करि विचलित लोचनिं नीर । प्रेमरवि समागमें अविकारी ॥ ध्रु० ॥
करि झल्कत आरंभा । त्यागुणें हृदयकमलदल खुलवी ।
तो हंसवित काल तमाल । धवलिता तारा धावत पळती ।
मृदु सुवासिं डुलवि जम्ता । मधु सुहास्य वदनीं रुळतां ।
आनंदगानिं आकाशा रडवी धाई ॥ १ ॥ (जाता त).

---

प्रवेश तिसरा.

स्थळ-मिशन हाऊस.

(रे. गुलेलू व पुट्टु पंडित.)

गुलेलू. आतां माझा वर्ण सर्वथैव तऱ्हेनें फसा दिसतो, असेंच तुम्हांला कबूल करणें अत्यावश्यक आहे. कां कीं मी आतां गोरा दिसतों.

पुट्टु. तें मला कबूल आहे. पण साहेब, गालावरील लालीची काय वाट !

गुलेलु. तुमची सूचना योग्य आहे. तो खरा साहेब नव्हे, कीं ज्याच्या गालावर गुलाबाची लाली नाहीं. (गालावर लाली देतो) आतां कसें !

पुट्टु. आतां ठीक जुळलं.

गुलेलु. पण बोलत सुटाल हेंच चोहींकडे, कीं रेव्हरंड गुलेलू तोंड रंगवितात.

पुट्टु. छेः छेः त्यांत काय बोलत सुटायचं. आम्हां हिंदूंना यांत कांहींच गैर दिसत नाहीं. आमचा सर्वांत मोठा देव म्हणजे शंकर.

त्यानं आम्हांला पहिल्यानदांच ही रीत घालून दिली आहे. तो स्वतः गौरवर्ण आहे, तरीही सर्वांगावर चिताभस्माची पावडर माखतो. आणि त्याच्याच अनुकरणानं प्रत्येक ब्राह्मण स्नान केल्यावर पहिल्यानं उत्तम-प्रकारच्या गोवरीची जाळून केलेली वस्त्रगाळं पावडर सर्वांगावर मारतोच. निदान शक्त्यनुसार चार बोटं कपाळावर आणि चार पट्टे हातांवर ओढतोच ओढतो.

गुलेलु. हिंदुधर्मांची महती मला सांगूं नका. कां कीं मी ख्रिस्ती आहें. आणि ख्रिस्तच जगाला तारणारा असून त्यालाच देव प्रीत झाला आहे. त्यालाच गायनवादन करा.

पुट्टु. तें आपलं तुमचं तुम्हींच पहा. मी कांहीं ख्रिस्ती नाहीं. मी ब्राह्मण आहें. अगदीं अस्सल कर्मठ ब्राह्मण आहें. आणि कांहीं केलं तरी मी ब्राह्मणच राहणार. त्यांत मुळींच फरक होणार नाहीं.

गुलेलु. सुंत असो किंवा बेसुंत असो—पण बाप्तिस्मा घेतांच तो ख्रिस्ती व्हावयाचाच. कां कीं तोच ख्रिस्ताचा दीक्षाविधी आहे, कीं जेणेंकरून आत्मा पावन झालेला त्याप्रत स्वर्ग देतो.

पुट्टु. असेल कदाचित्—पण मी कांहीं बाप्तिस्मा घेतलेला नाहीं. आणि जोंपर्यंत बाप्तिस्मा घेतला नाहीं, तोंपर्यंत मी कसाही वागलों तरी ब्राह्मणच राहणार.

गुलेलु. पण तुमचे कितीतरी ब्राह्मण आज ख्रिस्ती होऊन ख्रिस्ताच्या आत्म्यांत पावन झाले आहेत.

पुट्टु. मी म्हणतों ते सर्व वेडे होते.

गुलेलु. हा पवित्रधर्मांचा अपमान होत आहे, पुट्टु पंडित.

पुट्टु. मी म्हणतों ते सर्व वेडे होते. हवं तसं वागूनही ब्राह्मणत्व कायम राहतं, हें त्यांना माहीत नव्हतं.

**गुलेलु.** पुरे करा आतां हें ब्राह्मणांचें व्याख्यान—मला आज प्रभुभोजनास जावयाचें आहे. आतां ही एवढी केंसाची पट्टी बसविली कीं झालें.

**पुट्टु.** काय लावलंत तें ? पोमॅटम का ? तेंही आमच्या हिंदुधर्मांत आहे. तुमचं हें पोमॅटम दररोज लावावं लागतं. आमचं उंबराच्या चिकाचं पोमॅटम एकदां लावलं कीं, केंस जसे वळवावे तसे आमरण कायम राहतात. आमचे सर्व ऋषिमुनी आपल्या केंसाची पट्टी त्याच पोमॅटमनं बसवीत असत. शिवाय त्याच्या अंगी केंस सोनेरी करण्याचाही गुण आहे. सोनेरी केंस करण्यांत युरोपांतील लोकांनीं आमच्या ऋषि-मुनींच्या पिंगट जटांचंच अनुकरण केलं आहे.

**गुलेलु.** तुमच्या ऋषींची प्रौढी मजपुढें सांगूं नका. ते पाला खाऊन रहात असत. ते नुसते जंगली होते; आणि जेवल्यानंतर हिरवीं पानें तुम्हीं खातां, कां कीं तें तुमच्या ऋषींचें अनुकरण आहे.

**पुट्टु.** हें तर एक वेळ मीच तुम्हांला सांगितलं होतं. ( मालन येते ).

**मालन.** अझून नाहीं का तुमची तयारी झाली ? देवळास जायचं आहे ना ? साऱ्या मुली गेल्या सुद्धां. आतां मला सोबत कोण करील ?

**गुलेलु.** मी गेल्याशिवाय प्रभुभोजन होणार नाहीं; आणि प्रिय मालन, तुझ्याशिवाय मी कसा जाईन ? पहा—आतां मजकडे पहा. मीं किती गौरवर्ण आहें ? मला पहातांच तुला मोह पडलाच पाहिजे. कां कीं मी आतां सुंदर दिसतों.

**मालन.** भलतंच. चला आतां. डेव्हिडराव नाहीं का आले अझून ?

**गुलेलु.** डेव्हिडच्या मूर्खपणाला शंभर हायहाय ! मालन, प्रिय मालन, तो सैतान आहे. कां कीं तो मूर्तिपूजकांचा मित्र असतो; आणि दगडाच्या पुतळीला नमस्कार करणाऱ्या पाप्यांचा तो आदर करतो. त्याचें स्मरण करशील तर तूं आत्मिक नाहींस. कां कीं तुझा मूर्तिपूजकांशीं संबंध नसावा.

मालन. कसे का असेनात. ते मला आवडतात. माझं त्याच्यावर प्रेम आहे. इव्हा जशी आदामाला तशी मी त्यांना होईन.

गुलेलु. पण त्याचे मित्र मूर्तिपूजक साप सैतानासारखे तुला ज्ञानाचं फळ चाखावयास लावितील; आणि तूं प्रेमाच्या ईदनबागेंतून दियाबला-प्रमाणें पतन होशील.

मालन. प्रेमाचं ज्ञान होण्यासाठीं मी ज्ञानाचं फळ चाखीन. मग मला स्वर्ग न मिळाला तरी चालेल.

पुट्टु. पण डेव्हिडची पुनः ब्राह्मण व्हायची जोराची खटपट चालली आहे, असं मला कळलं आहे. ती खटपट जर यशस्वी झाली तर मालनला त्याच्याशीं लग्न करतां येणार नाहीं.

मालन. तर मग मीही त्यांच्यासाठीं हिंदु होईन.

गुलेलु. काय! त्या पाप्यासाठीं तूं पवित्र धर्माचा त्याग करशील!

पुट्टु. ती काळजी नको. आम्हीं त्याला केव्हांही हिंदू होऊं देणार नाहीं. मग ब्राह्मण होणं तर दूरच राहीलं. आमच्या शंकराचार्यांचे सर्वाधिकारी सर्व शास्त्रीमंडळाला पूर्ण अनुकूल आहेत; आणि स्वुद्द शंकराचार्यांनीं जरी असा प्रकार करण्याचं मनांत आणलं तरी जोराचा प्रतिकार करून आम्हीं त्यांना हाणून पाडूं.

गुलेलु. शाबास. तरच आमच्या ख्रिस्तीधर्माचा विजय होईल, कीं जर तुम्हीं हिंदूंनीं असेंच प्रतिकारित रहावें. पण हें काय! अजून डेव्हिड कां आला नाहीं? हा शिस्तीला विघात आहे. आतां मी त्याची वाट पाहूं नये. मालन, चहा तयार असल्यास आण पाहूं. (मालन जाते.)

पुट्टु. डेव्हिडच्या वांट्याचा चहा शिल्लक राहिला असेल. हें पहा, साहेब, त्याला आज मुळींच चहा देऊं नका. शिवाय असं पहा, आम्हां हिंदू लोकांना चांगला चहा मुळींच करतां येत नाहीं. आपण इथं

येण्यापूर्वी जे साहेब होते, त्यांच्याकडे फारच उत्तम चहा होत असे. ते केव्हां केव्हां मला चहा देत असत.

गुलेलु. म्हणजे? तुम्हीं आमचा चहा घेतां? तसें केल्यास तुम्हीं बाटले जात नाहीं?

पुट्टु. छे छे! मुळींच नाहीं. खिस्त्याच्या हातचं पाणी पोटांत गेल्यास चालेल. फक्त तुमच्या त्या कुंडातलं पाणी डोकीवर न पडण्याची खबरदारी घेतली म्हणजे झालं. शिवाय एक भांडं भरून पंचगव्य घेतलं कीं झालं काम. गोमुत्राच्या लहानशा घोटासरशीं पापाचे प्रचंड पर्वत भस्म होऊन जातात.

गुलेलु. त्यापेक्षाहीं आमच्या धर्माचा स्वीकार केल्यानें पाप लवकर जावें; आणि पापांच्या क्षमेनें तारणाचें ज्ञान द्यावें. (मालन चहाचें साहित्य घेऊन येते.)

पुट्टु. अस्सं, अस्सं, एकूण पाप धुऊन काढण्यांत गोमुत्रापेक्षां दुसरे जाज्वल्य प्रकार जगांत आहेत म्हणायचे. अरेरे! हें काय? मालनबाई, तुमचं डेव्हिडवर प्रेम आहे ना? मग तुम्हीं चहा घेऊं नका.

मालन. कां बरं?-प्रेमाचा चहाशीं काय संबंध?

पुट्टु. कां बरं?—हं थांबा, चहा घेऊं नका—आमच्या काय अगर तुमच्या काय, वाटतील त्या प्रेमकथा वाचा, दोन जोडप्यांचा संगम व्हायला मधें चहाचा पेला असतोच असतो. प्रणयिनीच्या हातच्या चहापात्रांतील चहाचा घोट घेतल्याशिवाय प्रियपात्राच्या प्रेमाचा घोट घशाखालीं उतरणारच नाहीं. इकडे आणा तो चहा. डेव्हिडराव चहाचा फार तिटकारा करतात.

मालन. असं का? मग मला नको तो चहा. तुम्हींच घ्या हा.

पुट्टु. याला म्हणावं खरं प्रेम. (चहा घेऊन पिऊं लागतो, इतक्यांत दुलारी येते.)

**दुलारी.** अरे वा! पंडित, तुम्हीं चहा घेतां? आणि तो इथं?

**गुलेलु.** ही काय बेशिस्ती? परवानगीशिवाय अंतःप्रवेश म्हणजे काय?

**दुलारी.** आह्मां वेड्या हिंदुलोकांना कुठली आली आहे शिस्त? आपलं दार उघडं दिसलं कीं, घरांत जावं, ही आमची नित्याची रीत. तशींच आलें. पण तुमची शिस्त मोडली असेल तर मला क्षमा करा.

**गुलेलु.** ठीक आहे. क्षमा मागतांच गुन्हा आकळला. बरें. बाई, आपण कोण?

**पुट्टु.** थांबा, मी तुमची ओळख करून देतों. दुलारीबाई, हे रेव्हरंड जोसेफ गुलेलु. साहेब, ही मिस् दुलारी, शंकराचार्यांच्या दरबारांतील बिंदुमाधव नामक एका शास्त्र्यांची मुलगी.

**गुलेलु.** (स्वगत) अहाहा! काय हें सौंदर्य! (उघड) आपली ओळख व्हावी, कां कीं तेणेंकरून मी आनंदलों. मी तुह्मांला प्रीत आहेंना?

**दुलारी.** म्हणजे?

**गुलेलु.** म्हणजे काय? मी प्रवचन करितों; आणि आमच्या पवित्र शास्त्रांत सांगितलें आहे कीं 'प्रीतीच्या पाठीस लागा; तरी आत्मिक दानांची उत्कंठा धरा आणि विशेषेंकरून तुह्मांस प्रवचन करतां यावें म्हणून ती धरा.' म्हणून म्हणतों, प्रिय दुलारी, तूं माझी अनुकारी हो.

**मालन.** अहो बाई, तुम्हीं तरी बऱ्याच दिसतां. हिंदु बायका म्हणे किती मर्यादशील असतात; आणि तुम्हीं तर धटिंगणासारख्या एकदम आमच्या कळपांत शिरून निर्लज्जपणानं वागत आहांत.

**दुलारी.** तुमच्या कळपांत शिरावं असं मला केव्हांही वाटणार नाहीं. मी केवळ डेव्हिड जोशांचा निरोप सांगायला आलें आहे.

**मालन.** अगबाई, डेव्हिडरावांचा निरोप? कुणाला? मला का?

**दुलारी.** हें काय पुट्टुपंडित, तुम्हीं इथं चहा कसा घेतलात?

**पुट्टु** हा असा घेतला. (पेला ठेवतो) वेडी आहेस मुली. तूं गीता कधीं वाचली आहेस?

**दुलारी.** गीता नुसती वाचलीच नव्हे, तर चांगली समजावून घेतली आहे.

**पुट्टु.** मग असं मुळींच म्हटलं नसतंस.

**गुलेलु.** काय? तुमच्या गीतेंत चहा आहे?

**पुट्टु.** आमच्या धर्मांत सर्व कांहीं आहे. पहा—सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः! म्हणजे सर्वांच्या हृदयांत मी चहास्वरूपानें विराजमान झालों आहें.

**मालन.** पण निरोप कसला आणलात?

**दुलारी.** डेव्हिडनीं सांगितलं आहे कीं, कांहीं कारणामुळं मला आज इकडे येतां येत नाहीं

**गुलेलु.** कांहीं कारणामुळें याचा अर्थ काय? हा काय उपमर्द? ही काय नोकरी? या मूर्खांना नोकरी म्हणजे काय, हें कसें न कळावें? आतां मी एकटाच चर्चमधें काय करावें? हें धिक्कारणें कसें सहन व्हावें?

**दुलारी.** कळला ना निरोप? मी येतें तर. पुट्टूपंडित, तुम्हांलाही यायचंच असेल घरीं.

**गुलेलु.** थांबा. जरा थांबा. दुलारीबाई, डेव्हिड न आल्यामुळें मी रागावून गेलों; पण तुम्हीं आल्यामुळें मी तृप्त झालों. तुमचा परिचय झाला हें माझें भाग्य!

**मालन.** पण डेव्हिड कां आले नाहींत?

**पुट्टु.** ब्राह्मण व्हायच्या खटपटींत असेल कदाचित्.

**मालन.** तर मग दुलारीबाई, मलाही ब्राह्मण करून घ्याच.

**पुट्टु.** मालनबाई, तुम्हीं ब्राह्मणच आहांत. अहो, ब्राह्मण म्हणजे द्विज, द्विज म्हणजे पक्षी, पक्षी म्हणजे पाखरूं! तुम्हीं तर पाखरासारख्या

उड्या मारीत गुलेलुसाहेबांना घायाळ करीत असतां, हें मी हरहमेश पहात आहें.

गुलेलु. गप्प बसा पुट्टु पंडित. दुलारीबाई, तुम्हीं मला तारण्याला देवासारख्या प्रीत व्हा. माझ्या स्मरणार्थ हें करा. मी खिस्ती असों किंवा कुणीही असों, प्रेमाला धर्म आड नसतो. हें ध्यानांत रहावें. कां कीं प्रेम हें उदार आहे. 'प्रवचनें म्हणा ती नाहींतशीं होतील; भाषा म्हणा, त्या संपतील; विद्या म्हणा ती नाहींशी होईल, पण प्रीती कधीं खुंटत नाहीं.' दुलारीबाई, मला आतां वेळ झाला. मी देवळास जातों चल मालन.

मालन. मी नाहीं येत. डेव्हिड नाहींत तें देऊळ मला काय करायंच आहे ? मी साफ सांगतें, मी मुळींच येणार नाहीं.

गुलेलु. याची शिक्षा तुला भोगणें येईल—काय करूं ? (घड्याळ पाहून) छेः आतां जावेंच. (हात पुढें करून) दुलारीबाई, येतों मी.

दुलारी. बरं, मीही येतें.

गुलेलु. हा माझा हात—दुलारीबाई, ही आमची रीत आहे.

दुलारी. पण ती आमची रीत नाहीं.

गुलेलु. दुर्दैव ! दुर्दैव ! हिंदूच्या रीतीला हायहाय ! गुड ईव्हनिंग (जातो)

पुट्टु. दुर्दैव तर खरंच. साहेबांनीं माझं पाणिग्रहण मुळीच केलं नाहीं. अरेरे ! मी सुंदर स्त्री असतों तर खरोखर त्यांनीं माझं पाणिग्रहण केलं असतं.

मालन. जळो तें सौंदर्य. पण दुलारीबाई, डेव्हिडराव खरोखरच ब्राह्मण होत आहेत का हो ?

दुलारी. मला काय माहित ? या पंडितानांच विचारा.



पुहू—हा असा घेतला. पान ३१

Manoranjan Press, Bombay.



गुलेलू—अहाहा ! जे प्रीत झाले ते धन्य.  पान ५०

पुट्टु. तो पुष्कळ म्हणेल; पण आमची तयारी पाहिजे ना? सारे हिंदू बाटून ख्रिस्ती झाले, हिंदुस्थानांत एकही हिंदू शिल्लक रहात नाहीं असं झालं, तरी बेहेत्तर; पण पश्चातापानसुद्धां परत येऊं म्हणणाऱ्या ख्रिस्त्याला आम्हीं हिंदुधर्मांत येऊं देणार नाहीं. आमची पूर्वपरंपरा कायम ठेवण्यासाठीं हिंदुधर्म अजिबात नामशेष झाला तरी आम्हीं त्याची पर्वा करणार नाहीं.

दुलारी. असंच करा बरं–

मालन. पण झालंच तसं तर मला घ्याल का हिंदु करून ?

पुट्टु. हो–हो घेऊं. वेड्या अहांत तुम्हीं मालनबाई. इकडचा सूर्य इकडे उगवेल; पण आम्हीं पतितपरावर्तनाला कधींही संमति देणार नाहीं. (जातो)

दुलारी. अहांतच तसे उदार. मालनबाई, तुमचा परिचय झाल्यानं मला फार आनंद झाला. कशाही कारणानं हिंदु होईन म्हणणारीं माणसं आम्हांला पाहिजे आहेत. मी तुमच्याबद्दल आमच्या बाबांना एकदां विचारून पाहीन.

मालन. खरोखरच माझ्यावर फार उपकार होतील.

दुलारी. आणि तुमचे हे गुलेलुसाहेब ! हे नाहींत का हिंदु व्हायचे ?

मालन. ते ? अगबाई ! ते तर कट्टे ख्रिस्ती आहेत.

दुलारी. फार प्रणयी दिसतात !

मालन. काय माझा छळ करतात म्हणून सागूं ! देवानं कशाला मला हें सुंदर रूप दिलं कोण जाणे. माझं खरं प्रेम आहे डेव्हिडरावांवर आणि तें कांहीं यांच्याच्यानं पाहवत नाहीं.

दुलारी. आणि डेव्हिडचंही तुमच्यावर प्रेम आहे वाटतं ?

मालन. तेंच तर मला कळत नाहीं ना !

दुलारी. तरीही तुम्हीं त्यांचा ध्यास धरून बसलां अहांत ? अरेरे–

पद. ( चाल—कैसि कटेंगे रतियां )

वैरि गमली अबला बाला । समुदित हृदयाला काय ॥ ध्रु० ॥
रवि करमाला । वाहे धरेला । उषा विरहीं वरितां त्याला ॥ १ ॥
तळपत चपला । बघुनि घनाला । लोटि अदय तिजला काळा ॥ २ ॥

( जातात )

---

## प्रवेश ४ था.

( बिंदुमाधव व डेव्हिड )

**बिंदुमाधव.** किती वेडा आहेस मुला ! निराशा म्हणजे नुसता भ्रम आहे. या जगांत मानवी प्राण्याला अशक्य असं कांहींच नाहीं. निराशा ही दुर्बलांची मानवी माया आहे. आशा म्हणजे पुरुषार्थाची प्रबलता आहे. अरे वेड्या, तूं सुशिक्षित आहेस, विचारी आहेस, पुरुष आहेस आणि मानवसमाजाची प्रतिष्ठा करण्यास पात्र होणारा एक मानवप्राणीच आहेस. दुराग्रहाच्या जोरामुळं आपल्या दुबळेपणाचं प्रदर्शन करणारे अविचारी विचारांध तुला प्रतिरोध करतील खरे, पण त्यामुळं डगमगून निराशावादी होऊं नकोस. मुठभर लोक म्हणजे कांहीं हिंदुसमाज नव्हे !

**डेव्हिड.** पण हे मूठभर लोकच समाजसंस्काराला अडथळा करितात. स्वतः कांहीं करित नाहींत; आणि कांहीं तरी करूं म्हणणाराला मात्र प्रतिक्षणीं आडवे जातात. काय सांगूं गुरूजी, आज मठांतला प्रकार पाहिल्यामुळं माझी काय स्थिति झाली असेल, याची तुम्हींच कल्पना करा. असलें प्रकार पाहात असूनही आशा कशी जिवंत राहावी ? आणि आशाच नाहींशी झाल्यावर देह तरी कशाला ठेवावा ?

**बिंदुमाधव.** छेः छेः हे उद्गार पुरुषाला तर मुळींच शोभत नाहींत. मठांतून येतांनाची तुझी स्थिति मी पाहिली ती मला फारच चमत्कारिक वाटली. तुझ्या नीतिमत्तेची खात्री नसती तर तूं दारू पिऊन झिंगला आहेस, असंच कुणी म्हटलं असतं. त्यावरूनच तुझी मनःस्थिति मी ओंळखली आणि तुला इथं राहून घेतलं.

**डेव्हिड.** आतां गुलेल्लूसाहेब खास माझ्यावर रुष्ट होतील. त्यामुळे कदाचित् माझी नोकरीही जाईल. इकडे मला एक रात्र घरीं राहूं देण्याबद्दल तुमचे शास्त्री तुमच्यावर नाखूष होऊन कदाचित् तुम्हांला बहिष्कृतही करतील.

**बिंदुमाधव.** सत्कार्यासाठीं समाजानं मला केवढीही भयंकर शिक्षा दिली तरी ती मी मोठ्या आनंदानं सोशीन.

**डेव्हिड.** पण असं करणं सत्कार्य ठरेल तेव्हां. आज तुम्हांला जी गोष्ट सत्कार्य म्हणून वाटत आहे, ती मताधिक्यानं अकार्य किंवा कुकार्य देखील ठरली जाईल.

**बिंदुमाधव.** मताधिक्यानं सत्कार्याचं परिमाण केव्हांही मापतां येणार नाहींत. अशावेळीं मतैक्यासाठीं समाजानंही आपला पुढारी ओळखून काढला पाहिजे. किंबहुना अशा पुढाऱ्यानंच समाजाला आपल्याकडे खेंचून घेऊन बहुमताला एकरूपता आणली पाहिजे. आज आमच्या श्रींना हेंच कार्य करायचं आहे. ईश्वरीकृपेनं पुढारीपणाचा हक्क अकल्पितरीतीनं त्यांना मिळाला आहे—

**डेव्हिड** अकल्पित कां? त्यागराजाचा शंकराचार्य झाला, हें सर्व आपल्या सर्वांगीण शिक्षणाचं फळ होय.

**बिंदुमाधव.** योगायोगाप्रमाणंच सर्व गोष्टी घडून येतात. आतां मिळालेल्या अधिकाराचं सार्थक झालं तरच पुरुषार्थ. ही वेळ मोठी कसोटीची आहे. या कार्याला सुशिक्षितांचं जरि पूर्ण पाठबळ आहे, तरी असा एक समाज आहे कीं, तो पूर्ववैभवाच्या खोट्या अभिमानाला बळी पडून या कार्याला भयंकर अडथळा करील. त्याचं समाधान आधीं झालं पाहिजे.

**डेव्हिड.** हें अवघड कार्य कसं होणार! निराशेनं होरपळून शेवटीं बाबांप्रमाणंच क्षयानं मरण्याचं तर माझ्या नशिबीं नाहीं ना? गुरुजी, लहानपणापासून मी मनांत केवढ्या भराऱ्या मारीत आलों आहें, वैभवाचे केवढे उंच मनोरे रचिले आहेत, कौटुंबिक सुखाचीं किती रम्य उद्यानं बांधलीं आहेत म्हणून सांगूं—त्या भराऱ्या गेल्या, ते मनोरे ढांसळले, तीं उद्यानं शुष्क झालीं.

पद. (चाल–साकेत नगरनाथ.)

ह्या काय हृदयघात । आक्रांत या जिवांत ॥ ध्रु० ॥
ग्रासील सावधानता । शोकातुरा विषवाही ज्वाला ॥ १ ॥
लोपेल देव जीविंचा । मानीं सदा अविनाशी ज्याला ॥ २ ॥

**बिंदुमाधव.** किती वेडा आहेस तूं मुला! कल्पनेच्या साम्राज्यांत इतकं फाजिल वावरूं नये, हेंच उत्तम. अशानं मनुष्य निराशेनं खचतो तरी एक किंवा आशेच्या सफलतेनं ठार बुडतो. निराशा हताश करते तशीच आशेची सफलता सुखाचा हव्यास वाढविते. सुख कधीं उपभोगून संपत नाहीं. उपभोगानं भोगेच्छा वाढते मात्र. आणि वाढलेल्या इच्छेच्या तृप्तीकरितां माणूस पापाच्या कर्दमांत अधिकाधिक रुतत जाऊन शेवटीं मातीमोल होतो. म्हणून सांगतों, आशा सोड आणि निराशाही सोड तरच तूं कृतार्थ होशील.

**डेव्हिड.** तर काय नशिबावर हवाला ठेवून स्वस्थ राहूं? नुसतं रडूं सुद्धां नये? आशा तर नाहींच पण निराशेच्या दुःखाचा देखील उपभोग घेऊं नको म्हणतां?

**बिंदुमाधव.** नशीब? कसलं नशीब? नशीब म्हणजे तुझ्या पायींचा पैंजण आहे. जसा नाचशील तसा आवाज देईल. ईश्वरावर भरंवसा ठेव, त्याला मात्र विसरूं नकोस.

**डेव्हिड.** कुठला ईश्वर? तुमचा कीं माझा?

**बिंदुमाधव.** दोघांचाही. सर्वत्रांचा, सर्व हिंदुस्थानाचाच नव्हे तर सर्व जगताचा–साऱ्या विश्वाचा ईश्वर. वेड्या मुला, काय ही कल्पना! ईश्वर कधीं दोन होते?

**डेव्हिड.** मग 'आकाशांतील बापाला' हे कां हांसतात?

**बिंदुमाधव.** नुसते शब्दाच्या भेदामुळं. शब्दभेदामुळंच हे मतभेद उत्पन्न झाले. त्याचेच पुढं धर्मभेद झाले आणि त्याचा व्युत्क्रम होऊन आतां धर्मद्वेषांत शेवट होऊं लागला आहे. तोच नाहींसा करणं हें शंकराचार्यांचं कार्य आहे; आणि तें कसं पार पडतं हेंच आतां पाहायचं आहे.

**डेव्हिड.** पुढें कांहींही होवो; पण आज माझ्याविषयीं तुम्हीं जी कळकळ दाखवतां, ती पाहूनच मी अझून जीव धरून राहिलों आहें. या तुमच्या उपकारांचा मी कसा उतराई होऊं ?

**बिंदुमाधव.** बाबारे, ही कळकळ तुझी नव्हे. ही सामाजिक कळकळ आहे, हा राष्ट्राला अंगभंगापासून बचावण्याचा प्रयत्न आहे. हा व्यक्तिविषयक असेल तर केव्हांही यशस्वी होणार नाहीं; पण तोच सार्वत्रिक झाला तर ईश्वराचा दयायुक्त हात आम्हांला मिळेलच मिळेल. जा आतां स्वस्थ झोंप घे.

**डेव्हिड.** झोंप ? कसली झोंप ? गुरुजी, मला झोंप कशी येईल ?—

पद. ( चाल—हो मिया जानेवाले )

या जिवा जागवाया । ये माया । प्रखर कठिना वागुरा बांधि काया ॥ ध्रु० ॥
नयनिंचा तारा उलटा झाला । मिटे कसला । जळे मजला अबला ।
रडवाया ॥ १ ॥

**बिंदुमाधव.** जा आतां. माझी आज्ञा पाळण्यासाठीं म्हणून तरी बिछान्यावर पड जा. ( डेव्हिड जातो ) काय बिचाऱ्याची स्थिति ही ! अशी स्थिति तरी कां न व्हावी ? पश्चात्तापानें तळमळत असणारे धर्मांतर केलेले किती तरी लोक असतील ! आईबापांच्या चुकीमुळें या डेव्हिड-सारखे अकारण रडत बसलेले असेच आणखीही कुणी असतील ! पण यांना कोण रडवीत आहेत ? आम्हींच ना ? हा आत्मघात आमचा आम्हींच करून घेत आहों. आतां आम्हींही मिशनरी बनलें पाहिजे. आम्हींही हिंदू वाढविले पाहिजेत. हिंदुस्थान आतां पुनः जिवंत होऊं लागला आहे. त्याला हात पाय नकोत का ? अशा लोकांना दूर ठेवून आम्हीं हिंदुस्थानाला दुर्बल करीत नाहीं का? खरोखर अशा कामीं आम्हांला सर्वत्रांची सहानुभूती मिळाली पाहिजे. पण ती कशी मिळणार ? हे सर्वसाक्षी परमेश्वरा, या तुफानांत आम्हांला मार्गदर्शक कर्णधार कोण देणार आहेस ?

**किशोरी.** ( प्रवेश करून बिंदुमाधवाला कवटाळून ) बाबा—बाबा, आतां मी काय करूं ? सांगा लवकर—आतां मी काय करूं ?

**बिंदुमाधव.** धीर धर.

**किशोरी.** धीर कसा धरूं? जीविताची संपूर्ण आशा नष्ट झाल्या-वरही धीर कसा धरूं; आणि तो कसल्या आशेवर?

**बिंदुमाधव.** आशेवर? नुसत्या आशेवर? किशोरी, तूं देखील इतकी दुबळी झालीस? वेडे, आशेसाठीं का जगायचं?

**किशोरी.** तर कशासाठीं?

**बिंदुमाधव.** मरण्यासाठीं—केवळ मरण्यासाठीं म्हणून जगावं लागतं. स्वतःला मरायचं आहे आणि दुसऱ्यांना जगवायचं आहे, म्हणूनच जगा-यचं. स्वतःचा देह, मन, प्राण दुसऱ्यासाठीं खर्ची घालायचीं आहेत, म्हणू-नच जगायचं.

**किशोरी.** नाहीं बाबा, तुमचा उपदेश मला पटत नाहीं. ज्या प्रेमांत मी माझा सारा जीव गुंतविला, साऱ्या आशा खर्ची घातल्या, सारी तन्मयता एकाग्र केली, फार काय—सारी जाणीव ज्या प्रेमाशीं मी तादा-त्म्यरूप केली, तें प्रेम असं ढांसळून पडल्यावर मी जगूं कशी?

**बिंदुमाधव.** आतांपर्यंत जगलीस तशी. नुसत्या निराशेच्या एका अभ्यासरशीं कुणी मरत नाहीं. निराशेच्या ज्वाळा तीव्र विचाराच्या फुंक-रानं चेतवून आमचें आम्हीच स्वतःला जाळून घेतों. अशी फुंकर न मारली तर जळून मरण्याची भीती नाहीं. स्वतःसाठीं जगतां येत नाहीं तर दुसऱ्यासाठीं जीव धरून ठेवावा. निराशेच्या पेटलेल्या ज्वाळेवर परोपकराचं पाणी त्यागाच्या झारींतून ओतावं, हाच त्याला उपाय. किशोरी, त्यागराजाला तूं टाकून तर बोलली नाहींस?

**किशोरी.** कां बोलूं नये? ज्यांनीं माझ्या सर्वस्वाचं मातेरं केलं, त्यांच्यावर मी नुसतं तोंडसुख सुद्धां घेऊं नये?

**बिंदुमाधव.** नाहीं—त्यानं कांहींच केलं नाहीं. ज्यानं तुझ्या सर्व-स्वाचं मातेरं केलं त्याला हवं तर टाकून बोल.

**किशोरी.** तुमच्यावर मी रागाऊं? तुम्हीं कदाचित त्यांचं हित पाहिलं असेल. कन्यादानापेक्षां संन्यासदानानं तुम्हीं त्यांना वैभवाची जोड मिळवून दिली असेल. पोटच्या गोळ्याच्या कल्याणापेक्षां आपल्या

शिष्याच्या वैभवानं आपली प्रतिष्ठा वाढविण्यांतच तुम्हांला आनंद वाटला असेल. जगत्कार्याचा आव घालून एका गरीब मुलीला प्रेमाच्या मार्गातून लाथाळून उडविण्यांत तुम्हांला कृतार्थता वाटली असेल. पण मी काय करावं ? माझं समाधान कसं व्हावं ! माझं जीवित कसं टिकावं ! माझ्या प्रेमानं कुठं जावं ? सांगा—आतां बोलत कां नाहीं ! सांगा ना—तुमच्या लाडक्या किशोरीनं आतां कुणासाठीं जगावं तें सांगा ना ?

**बिंदुमाधव.** पण आधीं असं सांग, तुझ्या सर्वस्वाचं मातेरं केलं त्यालाच तूं टाकून बोलणार होतीस ना ? मग माझ्यावर कां तुझा राग ?

**किशोरी.** तर मग कुणी माझा गळा कापला ?

**बिंदुमाधव.** तुझा तूंच—तूंच आपल्या सर्वस्वाचं मातेरं करून घेऊं पाहत होतीस; पण देवानं तुला त्या संकटांतून वाचविलं.

**किशोरी.** मीच ? मीच माझी वैरिण ?

**बिंदुमाधव.** होय—तूंच. तूं त्यागराजाला ओळखलं नाहींस.

**किशोरी.** तेही असंच म्हणाले.

**बिंदुमाधव.** अगदीं बरोबर म्हणाला—तुझं प्रेम अस्थानीं होतं—किशोरी, त्यागराज इतका संकुचित हृदयाचा नाहीं. त्याचं प्रेम एवढं अफाट आहे कीं, तें एका व्यक्तीच्या देहसौख्यासाठीं त्याला गुंतवितां आलं नसतं.

**किशोरी.** मग माझं वेडं मन त्यांच्याकडे कां ओढ घेत असे ?

**बिंदुमाधव.** वेडं म्हणून.

**किशोरी.** बाबा, किती निर्दय आहांत तरी तुम्ही ! माझी काय स्थिती झाली आहे, हें तुम्हीं कसं अजमावित नाहीं ? प्रेमाची निराशा किती दुर्धर असते, तें तुम्हांला अजमासानं सुद्धां का कळत नाहीं ? पहा—माझ्याकडे पहा—तुमची आवडती लाडकी मुलगी एका क्षणांत किती करपून गेली आहे तें पहा—

पद : ( चाल–काहे राजा. )

जीव जाया । आठवे विषाचा विचार ।
तनुभारें दमुनियां ॥ ध्रु० ॥ सुखविलास नुरला ।
विषादीं रमुनियां । मन दचके अनिवार ॥ १ ॥

**दुलारी.** ( प्रवेश करून ). ताई–ताई–आज काय गंमत झाली म्हणून सांगू ?

**किशोरी.** काय झालं ?

**दुलारी.** मला आतां बाटावं लागणार. बाबा, खरोखर आतां मला ख्रिस्ती व्हावं लागणार. अहाहा, काय तरी तें प्रेम ?

**किशोरी.** कुणाचं प्रेम ?

**दुलारी.** माझ्या वल्लभाचं.

**किशोरी.** सुब्रह्मण्याचं ?

**दुलारी.** नव्हे ग. मला आतां एक नवीनच वल्लभ आढळूं लागला आहे. त्याला पाहतांच मी प्रीत व्हावें. कां कीं, त्यांना प्रवचनें करावयाचीं आहेत.

**किशोरी.** हें कुठलं वेड आणलं आहेस आज ?

**दुलारी.** वेड नव्हे ग बाई, हें प्रेम आहे प्रेम. अस्सल स्वर्गीय म्हणजे आकाशांतलं प्रेम. अगदीं टेंकीला आलेलं, अगदीं गुडघे टेंकलेलं प्रेम. अहाहा ! ते तीन डोळे ! खरोखर त्रिनेत्रधारी शंकराचाच अवतार ! शंकर देखील पार्वतीवर असा एकाच क्षणांत भाळून गेला होता ना ग ?

**किशोरी.** असा एका क्षणांत म्हणजे ?

**दुलारी.** अग, आतांच रेव्हरंड जोसेफ गुलेलू जसे गोंईंयांवर प्रीत झाले तसा.

**बिंदुमाधव.** जगांत काय काय प्रकारचीं माणसं आहेत कोण जाणे !

**किशोरी.** दुलारी, बाबांसमोर असला व्रात्यपणा करायला तुला कांहींच कसं वाटत नाहीं ?

7217

**दुलारी.** कां लाज वाटावी ? हें प्रेम आहे ना ?

**किशोरी.** ( स्वगत ) खरंच. मीही आतां किती निर्लज्जपणानं बोलत होतें !

**दुलारी.** खरंच सांगूं बाबा. ते गुलेल्लूसाहेब मला फार आवडले. किती गोड आहेत ते ! अहाहा ! त्यांची आठवण होतांच मला हसूं लोटतं. काय बरं म्हणाले ते ? हो—मला तारण्याला तुम्हीं देवासारख्या प्रीत व्हा—केवढं हें त्यांचं प्रेम ! अहाहा ! काय तो चेहेरा ! किती पांढरा स्वच्छ ! जसा कांहीं पिठांत घोळवलेला पापडच. ती गालावरची लाली ! कशी नुकतीच शिंटकावलेली दिसत होती. छी–छी. मी अगदीं बेहोष होऊन गेलें आहे म्हणा ना ? आतां काय करावं ? आपण कांहीं बाटणार नाहीं. कुणी तरी बाटल्याशिवाय कांहीं लग्न करतां यायचं नाहीं. ( विचार करून ) हं ठरला बेत. अगदीं असंच.

**किशोरी.** काय ठरला बेत ?

**दुलारी.** तुला कशाला सांगायचा तो ? काय तें आतां आपोआप दिसून येईल. तुला कशाला सांगा ? तूं ही अशी आंबट तोंड करून रडणारी. तुला कांहीं तें पसंत पडणार नाहीं. चला बाबा, आधीं घरांत चला. मी तिकडेच तुम्हाला सांगतें.

**बिंदुमाधव.** डेव्हिडचा निरोप ऐकून ते रागावले तर नाहींत ?

**दुलारी.** रागावले थोडेसे. पण देव प्रीत होतांच त्यांचा सारा राग पार मावळून गेला. चला बाबा आधीं ( ती व बिंदुमाधव जातात ).

**किशोरी.** काय तरी मन आहे हें ? ही माझी बहीण—माझ्याहून वयानं लहान आहे. सुब्रह्मण्यांवर तिचं प्रेम आहे. त्यांचंही तिच्यावर प्रेम आहे. पण अजूनपर्यंत माझ्यामुळं त्यांचं लग्न अडून राहिलं आहे. सुब्रह्मण्य देखील शंकराचार्य झाले असते. पण हिच्या प्रेमासाठीं—नव्हे,नव्हे—त्यागराजानींच त्यांना हाणून पाडलं. काय झालं हें ? मी सुखी झालें असतें तर दुलारी रडत राहिली असती. आतां ती सुखी झाली आहे—नाहीं. माझं लग्न झाल्याशिवाय ती कशी सुखी होईल? माझं लग्न झाल्याशिवाय लग्न न करण्याची तर तिची प्रतिज्ञा आहे. मग काय होणार

आहे ? आम्ही दोघीही कुमारिकाच्च राहणार का ? कीं दोघींचींही लग्नं होणार ?—नाहीं—नाहीं—नाहीं. माझं लग्न ? छे: अशक्य ! माझं लग्न आतां होणार नाहीं. आतां मीही रडणार, दुलारी रडणार, सुब्रह्मण्य रडणार, आणखी कोण कोण रडणार आहेत कोण जाणे ? भवितव्यते, तुझ्या पोटांत काय सांठवलं आहे, तें मला दाखिवशील का ग ? कीं, आम्हीं सारींच हंसणार आहोंत ? त्यागराज तर हंसतच आहेत, दुलारी आतां हंसत आली आहे, सुब्रह्मण्य आणि—आणि कोण ? डेव्हिड ? तो ख्रिस्ती ? कुठं बरं पाहिलं होतं मी त्याला ? लाहोरला का ? होय. शाळेंत जातांना का ? असेल. मला काय करायचं आहे त्याच्याशीं ? असेल. पाहिलंही असेल. पण आतां मला कांहींच आठवत नाहीं. पण त्याला आठवतं ? त्याची आठवण इतकी धड कशी ? हा काय घोटाळा आहे ? नको—तो विचारच्च नको. सारा विषमतेचा बाजार आहे झालं—

पद. ( चाल—सावरियां सवरियां.)

सविनया असुनियां भुवनीं या मी किति झालें अविनया ॥धृ०॥
कैसा न ठावा हृदया विसावा। हतबल दैवें गतभया ॥ १ ॥

( जाते ).

अंक पहिला समाप्त.

---

K. A. Santhanam

107

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

### स्थळ—नदीतटाक.

डेव्हिड. एवढ्या पहांटेपूर्वी त्यांचं घर सोडून निघालों. मनाशीं चोरी कशी करतां येणार? ज्या बालिकेला रस्त्यांतून जातांना पाहून एका वेळीं मी स्तब्ध झालों होतों, तीच किशोरी ठरली. तिचं त्यागराजावर प्रेम आहे. त्यागराज तिच्या प्रेमाच्या परिपूर्तीपलिकडे गेला आहे खरा. पण तिचं मन निर्मळ आहे, हें मी तरि विसरतां कामा नये. ज्या घरांत किशोरी होती त्याच घरांत मी होतों. तिच्या पदधुलीनं पवित्र झालेल्या भूमीवर मी पाय कसा द्यावा! स्वर्गांत चमकणाऱ्या चांदणीला मृत्युलोकांतल्या मस्तकावर कसं आणतां यावं? त्या चांदणीकडे नुसतं पहावं, मार्गभ्रष्ट होऊं नये म्हणून तिच्या गतीच्या अनुरोधानं पाऊल टाकावं, एवढाच माझा अधिकार. ती स्वर्गाची देवता आणि मी मृत्युलोकच्या धुळींतला दुबळा कीटक! प्रेमाची अंधुकशी कल्पनासुद्धां इथं असह्य वाटेल.—

पद. ( चाल—जानेदे मैका सूनो ).

या नभिं मेघां मोही महानिशा। धाइ रडति वरि घडि घडि उसळे
गार। महिवरि आणीति अशनिपात ॥ ध्रु० ॥ बिजलि त्या रविं नाचे।
पळभरि तमासि दिपवीत जातां निजधामीं। घनतमिं वरुषे धार। बुड-
वित सागरिं रजनिनाथ ॥ १ ॥

बिचारी मालन, मनोविकाराला बळी पडून स्वतःला फसवीत आहे. विवाहसौख्याला मी अपात्र आहें, हें तिला सांगूनही पटत नाहीं. मिशन-हाऊसकडे जातांच तिनं मला अडिवलं. पण गावांत पूर आल्याचं तिथंच कळलं म्हणून तिच्या कचाट्यांतून सुटून येतां आलं. परावर्तनाखेरीज दुसऱ्या कोणत्याही विषयाला माझ्या हृदयांत अजून जागा नव्हती; पण किशोरी—नको. तिचं नांव उच्चारण्याचा देखील मला अधिकार नाहीं.

पद. ( जो हमने तुमसे. )

मी दमन करुनिया या मना । झणिं करिन दान हे विफल प्राण ॥ध्रु०॥
बुडतां ठार भवजलाघातें । मी जरि जाई खोल खोल । इतर जनिं उतराई।
स्वतनुघातिं ॥ १ ॥

फिर मना–मागं फिर. इकडे पहा, या अनर्थाकडे पहा. किती घरं कोसळत आहेत हीं ! किती लोक बुडत आहेत हे ! हीं बायका मुलं–अरेरे ! काय भयंकर प्रसंग हा ! बुडत असतांना देखील हे द्रव्याची पेटी कवटाळित आहेत ! जीवाची आशा आतां सोडलीच पाहिजे. स्वतः बुडतांना दुसऱ्यांनां वाचविलंच पाहिजे ! ( उडी घेतो. )

---

प्रवेश दुसरा.

स्थळ–रस्ता.

( मालन प्रवेश करिते. )

मालन. या पावसाचं सारंच काहीं चमत्कारिक. त्या तिकडे पाऊस सारखा कोसळत आहे, तर इथं त्याचा मागमूस देखील नाहीं. या पृथ्वीवरच्या माणसांत जिकडे तिकडे धरसोडीचं वर्तन दिसतं, तसंच स्वर्गांतल्या दूतांचं देखील असतं का ? डेव्हिडरावांना मी पृथ्वीवरचे देवदूत समजत आलें, त्यांनींही अशीच धरसोड चालविली आहे. कसे माझा हात झिडकारून गेले ? मी कुरूप का आहें ? वेडी का आहें ? अशिक्षित का आहें ? मग मला त्यांनीं कां झिडकारावं ? कारण सांगितलं पूराचं ! पण कुठं आहे इथं पूर ? मिशनहाऊसच्या बाजूला थोडासा पाऊस पडत होता खरा –– पण इथं काय आहे ? त्यांनीं मला फसवलं तर नाहीं ? छीः ! भलतंच ! ते केव्हांही खोटं बोलत नाहींत. मग पाऊसच वाटतं खोटा ? किंवा खोट्याच्या पावसांतच तर ते नाहींना सांपडले ? गुलॅव्ह-साहेब त्यांचा द्वेष करतात, म्हणून मी एवढी जपतें. आज शब्बाथच्या दिवस. कुठं काहीं काम केलेलं दिसलं तर केवढी कडक शिक्षा देतील. नोकरीवरूनच जर दूर केलं तर जातील कुठं नि खातील काय ? ना घर––ना दार. नको–नको मेली ती कल्पना ! छीः ! त्यांना आतां

शोधून काढलंच पाहिजे. दिसूंदेत तर खरे—अशी दोन्ही हात पसरून वाटेवर उभी राहीन. अगदीं एक पाऊलसुद्धां पुढं टाकूं द्यायची नाहीं. अगदीं हट्टच धरून बसले तर अशी घट्ट कवटाळून धरीन.

**दुलारी.** ( प्रवेश करून ) हं–हं–कोण तें ? मालन ? अग मी ती दुलारी. मला डेव्हिडरावच समजलीस कीं काय ?

**मालन.** कोण ? तुम्हीं का त्या ? मला क्षमा करा. माझी चूक झाली. मी अगदींच भ्रमांत होतें.

**दुलारी.** कसला भ्रम ? खरंच. कुणीं म्हणतात प्रेमानं भ्रम उत्पन्न होतो. त्यातलंच काहीं आहे वाटतं.

**मालन.** हें काय बरं ? माझा जीव भयानं वाळून गेलेला, आणि तुम्हाला आपली थट्टाच सुचते ! माझी गरिबाची कशाला करतां थट्टा ? दुलारीबाई, मी केवढया भयंकर प्रसंगांत आहें, हें तुम्हांला कळलं तर तुम्हीं देखील माझ्यासारख्या भ्रमिष्ट व्हाल.

**दुलारी.** गुलेल्लूसाहेब रागावले आहेत वाटतं ? बरेच जलद बोलण्याइतके रागावले आहेत, कीं, आपलं रोजचं ठाय लईचं रागावणं आहे ?

**मालन.** अझून नाहीं काहीं रागावले. पण जर का ही हकिकत त्यांना कळली तर—नकोच ती कल्पना ! आज शब्बाथ ना ?

**दुलारी.** हो—आजच रविवार. पण अझून सूर्यदेखील वर आला नाहीं. या भर पहाटे तुम्हीं चाललांत कुणीकडे ?

**मालन.** काय सांगूं दुलारीबाई, डेव्हिडराव—छेः पण मला आधीं जाऊं दे त्यांना शोधायला. नाहींतर भलतंच कांहींतरी व्हायचं.

**दुलारी.** कुठं गेले आहेत डेव्हिडराव ?

**मालन.** त्यांना कुणी सांगितलं कीं, तिकडे गांवांत तुंगा नदीला पूर येऊन गांव बुडत चालला आहे; म्हणून बुडणाऱ्या लोकांना मदत करण्यासाठीं ते धांवतच निघून गेले.

**दुलारी.** साहजिकच आहे. या संसाराच्या पूरांत वाहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला नदीच्या पुराचीसुद्धां भीति वाटणारच.

**मालन.** नाहीं हो. त्यांना भीति वाटली असती तर किती बरं झालं असतं ! पण छेः ! अगदीं निर्भयपणानं धांवत गेले.

**दुलारी.** आणि गुलेलसाहेब ? ते नाहींत वाटतं गेले ?

**मालन.** ते ? अगबाई ! आज शब्बाथ ना ?

**दुलारी.** खरंच तें. तुमच्या भाषेंत बोलायचं, म्हणजे न कर्त्यांचा वार रविवार. आमचा न कर्त्यांचा वार असतो शनिवार. कारण शनीची काळोखी आली कीं, आम्हीं कर्तृत्वहीन बनतों; आणि सूर्याचा पूर्ण प्रकाश सांपडला म्हणजे तुम्हीं आळशी बनतां. पण आम्हां ब्राह्मणांना रविवार म्हणजे फारच उद्योगाचा दिवस असतो. डेव्हिडराव ब्राह्मणच आहेत कीं नाहीं ! त्यामुळं सूर्योदयापूर्वी नदीतटाकीं परोपकाराचं अर्घ्य वाहण्याची त्यांना बुद्धि होणं साहजिक आहे.

**मालन.** मग चला ना तिकडेसच. माझा जीव कसा अगदीं घाबरून गेला आहे.

**दुलारी.** त्यांत काय घाबरायचं ? परोपकारासाठीं देह खर्ची पडला तर काय वाईट ?

**मालन.** त्यांच्यावर माझं प्रेम आहे ना ?

**दुलारी.** आहे ना ? म्हणूनच भ्यायला नको. भय वाटलं तर प्रेम नाहीं म्हणून समजावं. मालन, वेडे पोरी, प्रेमाला स्थलकालाची कसली चाड ? आम्हीं हिंदु एका जन्मानं प्रेमाचा प्रपंच निरखून टाकित नसतों. चौऱ्याऐंशीं लक्ष जन्म—

**मालन.** ओ होली मदर ! ( Oh Holy Mother) चौऱ्याऐंशीं लक्ष जन्म ?

**दुलारी.** हो–हो–चौऱ्याऐंशीं लक्ष. एवढेचसे काय ? अनंत जन्माच्या अंतापर्यंत देखील आम्हीं प्रेमासाठीं तिष्ठत राहूं.

**मालन.** तर मग दुलारीबाई, मला हिंदु करून घ्याच. आम्हीं ख्रिस्ती एका जन्मानं एवढे घाबरतों; पण असंख्य जन्माचं तुम्हांला काहींच कसं वाटत नाहीं ? असंख्य जन्म ? अगबाई ! असंख्य जन्म ? असंख्य जन्म म्हणजे काय असेल कोण जाणे !

**दुलारी.** तें आम्हींच जाणतों. आणि ज्यांना तें समजत नाहीं, त्यांनां आम्हीं हिंदु म्हणजे एक कोडंच होऊन राहूं. जा पोरी, जा आपल्या मिशन हाऊसमधें! आणि शाब्दिक स्वातंत्र्याच्या बंधनांत स्वतःला कोंडून घे जा.

**पुट्टू.** ( प्रवेश करून ) कोण मालन ? दुलारी ? अग वेड्या पोरींनों, यावेळीं तुम्हीं इकडे कुणीकडे ? प्रातःस्नान नाहीं—काहीं नाहीं. स्नान नाहीं, संध्या नाहीं. तुम्हीं या उभ्या पहाटे कुठं निघालांत ? गावांत नदीला पूर आला आहे तें आहे का तुम्हांला माहित ? पळा—पळा वर मठाकडे जा, नाहीं तर मिशन हाऊस तरी गांठा. सध्या दोनच मार्ग काय ते खुले आहेत. त्यांतल्या त्यांत मिशनहाऊसच बरं. कारण तें आहे अगदीं टेकडीवर. आणि आमचं धर्मशास्त्र काय म्हणतं ? ' उत्तमे शिखरे जाते. ' उत्तम आहेत ते शिखरावर जातात. हं—हं. ' गच्छ देवी यथासुखं.'

**मालन.** तुम्हींच पळा हवे तर. दुलारीबाई, मला पूराच्या जागीं घेऊन चला ना.

**दुलारी.** या रस्त्यानं अशा सरळ जा.

**पुट्टू.** अहो माझं ऐका. तिकडे जाऊं नका. बुडून मराल, मग फुकट पश्चात्ताप होईल.

**मालन.** नाहीं हो. मला रस्ता कळत नाहीं. थोरल्या मिशिसाहेब बरोबर असल्याशिवाय आम्हांला कुठंच जाऊं देत नाहींत. मग तुम्हींच सांगा, मला रस्ता कसा कळेल ?

**दुलारी.** गरीब बिचारीं कोंकरं! बिचारीं मेंढपाळामुळं परतंत्र झालीं.

**पुट्टू.** पळा, पळा. कसलं पारतंत्र्य आणि कसलं स्वातंत्र्य! तें पहा तुंगेचं पाणी कसं जोरानं वर चढतं आहे.

**मालन.** चढूं दे. मी आपली बुडून मरेन.

**दुलारी.** केव्हांही नाहीं.

**पुट्टू.** खरंच नाहीं. हा पहा, तुला तारण्यासाठीं तुझा मेंढपाळच इकडे येत आहे.

**मालन.** कोण डेव्हिडराव? नव्हे–(भयानें) दुलारीबाई, हे गुलेल्लू-साहेब आले! आतां काय करूं?

**पुट्टू.** रडा–आतां रडा–तरी मी सांगत होतों. पण माझं ऐकतं कोण? (गुलेल्लू येतो).

**गुलेल्लू.** मालन, हें काय? तुझें कर्तव्य तुला कसें न कळावें? तूं करीस त्याचप्रमाणें करावें, हें तूं कसें विसरावें? हीं दुर्दिनांचीं अद्‌भुतें आणि चिह्नें पहायास आकाशांतील बापानें तुला जे डोळे द्यावे, त्याचा उपयोग नसल्यानें तूं आपणास बहुत खेदांनीं भोसकून घेतलें आहेस. आज शब्बाथ ना? प्रियांनो! तुमचें नीतिमत्व काय झालें?

**दुलारी.** नीतिमत्व गेलं वहात तुंगेच्या पुरांत. आतां अंतिमत्वाला जपा, म्हणजे झालं.

**गुलेल्लू.** कोण दुलारी? मी तुमच्या प्रीतदर्शनाला अंचवावें, हा माझा गुन्हा. माझ्या अंधतेला हाय हाय! प्रिय दुलारी, मी क्षमेला पात्र व्हावें अशी प्रार्थना करितों.

**पुट्टू.** काय हें साहेब? या फटकळ पोरीची कसली क्षमा मागतां?

**गुलेल्लू.** पुट्टू पंडित, ही सौंदर्यदेवता उंचावलेली आहे. हिचें भजन करा. गौरवानें गौरवित होत असलेली ही, हिच्यापुढें गुढघे टेंकायास मी आनंदावें. प्रीतीनें मला जन्मविलें आहे म्हणून मी माझ्या पवित्राला कुजूं देणार नाहीं. पहा, या सौंदर्यिकेला स्तोत्र करा. यासाठीं कीं, तिनें प्रसन्नवून माझी अनुकारी व्हावें. जा मालन घरीं. शब्बाथ पाळ. नाहींतर तूं आत्मिक नाहींस.

**दुलारी.** (स्वगत) हा वाटेंतला काटा काढायचा उपाय दिसतो.

**मालन.** मी नाहीं जाणार. मी डेव्हिडरावांना शोधून काढल्याखेरीज आता मुळींच घरीं जाणार नाहीं.

**गुलेल्लू.** मालन, तुझें भाषण मला आत्म्यांत व्याकुल करितें झालें. तूं पवित्रशास्त्र अमान्यितेस? मला दबावितेस?

**मालन.** पवित्रशास्त्र म्हणतं, 'शब्बाथ मनुष्यासाठीं झाला, मनुष्य शब्बाथासाठीं झाला नाहीं'

**गुलेलू.** भटकलेल्या कोंकरे, हें काय भाषण? तूं मला शिकवण द्यावी काय? मी तुझें केव्हांही न ऐकावें. जा—घरीं जा. आढयता मिरवूं नकोस. कां कीं, मी तर प्रभु येशू खिस्त याच्या वधस्तंभाच्या आढयतेशिवाय कशाचीही आढयता मिरवावी, असें न होवो. त्याकडून मला जग व जगाला मी वधस्तंभीं दिलेला आहें. जा, आतां अधिक पुसायास मला अवधि नसतो.

**मालन.** नाहीं जात जा. काय माझं करायचं तें करा. मी काहीं आतां तुम्हांला भ्यायचो नाहीं. फारच त्रास दिलात तर अश्शी जाईन नि हिंदू होईन.

**पुट्टू.** गप्प गप्प. काहींतरी बोलूं नकोस.

**गुलेलू.** तुझ्या बुद्धीला हाय हाय! तुझ्या दुर्भाषणाला हाय हाय! तुला शिकवण देणाऱ्या पतितांना हाय हाय!

**दुलारी.** हं हं—सावकाश—सावकाश. लय बढूं लागली.

**गुलेलू.** प्रिय दुलारी, मालनला धिक्कार! पण माझें लय तुझ्या प्रीतींत बढावें. कां कीं, तूं माझी नेत्रांची तारका व्हावें; यासाठीं कीं, मी आरंभापासून प्रीतीच्या सांगातीं असत आलों आहें.

**मालन.** दुलारीबाई, त्यांच काय ऐकतां? मला डेव्हिडरावांकडे नेतां ना?

**गुलेलू.** अगे बहकले, शिक्षा पावतांच तुला रडणें व दांत खाणें होईल. पुट्टपंडित, हिला तुम्हीं पकडावें आणि घरीं न्यावें. जा मालन 'तुझे शत्रू तुझ्याभोंवती मेढेकोट बांधून तुला वेढितील आणि तुझ्यांत धोंड्यावर धोंडा राहूं देणार नाहींत.'

**पुट्टू.** चल—चल, मालन. तूं घरीं जा. मी डेव्हिडला शोधून घेऊन येतों.

**मालन.** खरोखर ? शपथ ? तसं नको. अगदीं कसली तरी मोटी शपथ घ्या.

**पुट्टू.** ( जानवें दातांत धरून ) या यज्ञोपवीताची शपथ-मी डेव्हिडला शोधून आणतों.

**मालन.** चला तर. ( जाते ).

**पुट्टू.** दातांत सूत धरलें कीं शपथ मोकळी होते, असं धर्मशास्त्र आहे. ( जातो ).

**गुलेलू.** दुलारीबाई, आतां प्रभूनें आपणास एकांत द्यावा. कां कीं, उदयावर सूर्य येत असावा, असें पहायास प्रेमाचें अभिवचन व्हावें.

**दुलारी.** प्रेमाचें अभिवचन ? प्रेम असं एका क्षणांत का प्रबळ होतं ? आराधनेशिवाय कधीं देवता प्रसन्न होतात का ?

**गुलेलू.** तर मग वधस्तंभाचें अडखळण नाहींसें झालें.

**दुलारी.** पण मी कांहींच वचन देत नाहीं, हें ध्यानांत ठेवा.

**गुलेलू.** ही मनावणी तुम्हांस बोलावणाऱ्याची नाहा, हें ध्यानांत असावें. कां कां, माझ्या बंगल्यावर तुमचें आगमन एकांत करील. अहाहा ! जे प्रीत झाले ते धन्य ! आमेन. ( जातो ).

**दुलारी** पण माझं आगमन केव्हा आकांत करणार आहे हें या मूर्खाला काय माहित ? किती विसरभोळी मी ! बाबांना आधीं शोधून काढलं पाहिजे. बहुधा ते पुराच्या जागींच गेले खास. ( जाते ).

---

प्रवेश तिसरा.

स्थळ-देवघर.

( आसनस्थ श्री. )

**श्री.** ‘ कुणा सडक्या मेंदूच्या आधारानं ही गादी उत्पन्न केली ’ असंच काल किशोरी म्हणाली. राजवैभवाच्या आकांक्षा पूर्ण करण्याच्या

आवडीनं विद्यारण्यांनींच हें अवडंबर उभारलं नसेल ना? अमात्य पदावर असलेल्या माधवाचार्यनं कृष्णाजिनाच्या आसनावर समाधान मानलं असेल, पण शंकराचार्य झालेला तोच विद्यारण्य, गमावलेलं वैभव उकरून काढण्यासाठीं राजमुकुट धारण करूं लागला नसेल कशावरून? वैभव हाताशीं असत त्यावेळीं त्याचा त्याग करणं सुलभ असतं. पण वैभवाचा थैथयाट समोर दिसत असतांही वैभवहीनाला मन आवरतां येईल का? अमात्य असतांना माधवाचार्य त्यागी राहिले; पण टाकून दिलेलं वैभव हातसांड झालेलं पाहून त्याच माधवाचार्यांनीं शृंगेरीचा शंकराचार्य नांवाचा राजा निर्माण केला नसेल ना? हा मुकुट संन्याशाच्या डोक्याला शोभत असेल का? डोकीवर मुकुट चढवायचा होता तर शंकराचार्यांच्या महालांत आरसा कां ठेवला नाहीं? हा महाल कीं मठ? कैदखाना तर नव्हे ना हा? खरंच, कैदखान्यांत सिंहासन नसतं मागंपुढं शिपाई असतात खरे पण जयघोषाच्या ऐवजीं कैदखान्यांत नुसत्या किंचाळ्याच ऐकूं येतात. किंचाळ्यांत आणि जयघोषांत तरी फारसा फरक आहे कुठं? असमाधानाच्या वैभवांत जयघोष देखील किंचाळी इतका दुःसह होतो. हा मुकुट डोक्यावर नसेल, हें जरतारी महावस्त्र सर्वांगाला जखडित नसेल, तरीही हे चोपदार ललकारतील का? सुवर्णमुकुटा, बिचाऱ्या सुवर्णमुकुटा, तुला डोक्याचंच सिंहासन हवं असतं का? समाधीच्या शिलेवर किंवा थडग्याच्या चबुऱ्यावर तुझी स्थापना झाली तरीहि हे लोक तुझ्यापुढं माना वांकवतील का रे? नुसतं माणसाचंच डोकं तुला सिंहासनाला पुरतं कीं कसलाही गोटा असला तरी चालतो? नारळाच्या करवंटीवर हा मुकुट ठेवला तर फार सुंदर दिसेल नाहीं? एकदां ठेवून पाहिला पाहिजे. पण नारळाच्या करवंटीवर हा मुकुट बसेल का? या मुकुटाला डोक्याची करवंटी जितकी मानवते तितकी नारळाची नाहीं मानवणार कदाचित? ( मुकुट डोक्यावर ठेवून ) काय वाटतं आतां? मान ताठ होते, छाती पुढं येते. अभिनाचा ताठा वाढवायला हा उपाय चांगला दिसतो. पण संन्याशाला अभिमान शोभेल का? इतक्या शंकराचार्यांनीं हा मुकुट मस्तकावर वागविला, त्यांच्या डोक्यांत हे विचार आलेच नसतील का? किंवा ते मुकुटाच्या वजनाखालीं दडपून गेले? या मुकुटाच्या वजनाखालीं असंख्य

राष्ट्रांची सदसद्विवेकबुद्धि जर सहज दडपली जाते तर एका यःकश्चित् संन्याशाच्या डोक्याची काय कथा ? हें दडपण झुगारून दिल्या-खेरीज गत्यंतर नाहीं. किशोरीला दिलेलं वचन पुरं केलच पाहिजे. पण तें पुरं कसं होणार ? शेंकडों वर्षं शंकराचार्यांच्या डोक्याला मुकुट खिळ-वून टाकणारे ऑर्थोडॉक्सीचे पोलादी खिळे कसे मोडतां येणार ? आद्य श्रीशंकराचार्यांचं मुकुटधारी चित्र अजून तरी कुठं सांपडलं नाहीं. मग परंपरेच्या वेड्याखुळानं माथ बिघडवून हा सोन्याचा धोंडा मी मस्तकावर कां वागवावा ? सोन्याच्या गुलामगिरीखालीं शंकराचार्यांनं कां मान वाकवावी ? मी संन्यासी आहें. मी स्वतंत्र आहें. शिवोऽहं शिवोऽहं शिवः केवलोऽहम् ॥ असा मुक्तकंठानं टाहो फोडणारा शारदांबेचा चिरंजीव पुत्र हें माझं मस्तकावरचं मुकुटरूपी संकट ही पायाखालची सिंहासनाची जळती ज्योत उखडून टाकणार नाहीं का ? अरेरे ! काय ही संन्यासाची विटंबना ?

पद ( तुम अत अलबेलो. )

शिरिं धरि मुकुटाला । श्री तोचि झाला । काषायवसनधारि ॥ ध्रु० ॥
त्यागी त्यागा धरि अनुरागा । विभविं जो वांकला । बांधवधन हरि ॥ १ ॥

**सुब्रह्मण्य.** ( प्रवेश करून ) नीलाचलपीठाचा विजय असो.

**श्री.** तथास्तु. सुब्रह्मण्य, हा तुमचा आशीर्वाद खरोखरच खरा होवो.

**सुब्रह्मण्य.** खरोखरच खरा ? म्हणजे कसा काय ?

**श्री.** असं म्हणा संन्यासाचा विजय असो, दारिद्र्याचा विजय असो, भिकेच्या कटोऱ्याचा विजय असो. कां ? बोलत कां नाहीं ? या सुप्रभात-कालीं याहून दुसरा गोड आशीर्वाद कुठला आहे, असं तुम्हाला वाटतं ?

**सुब्रह्मण्य.** ही भविष्यवाणीच ऐकली म्हणून मला थोडं आश्चर्य वाटलं. श्रींना गांवांतल्या अनर्थांची खबर कळली वाटतं ?

**श्री.** गांवांतला अनर्थ ! गावांत अनर्थ का व्हावा ? गावांतले लोक कांहीं सुवर्णमुकुट धारण करीत नाहींत.

**सुब्रह्मण्य.** तुंगेला महापूर येऊन सारा गांव वाहून गेला.

**श्री.** अस्सं. इंद्रानं आपला रत्नजडित मुकुट मोडून पृथ्वीवर सारीं रत्नं उधळून दिलीं वाटतं ! शक्य आहे. इंद्राला देखील आतां मुकुटाचा वीट आला असेल.

**सुब्रह्मण्य.** केवढा भयंकर अनर्थ तो ! हजारों घरं पाण्यांत टाकलेल्या ढेकळासारखीं विरघळून गेलीं; हजारों तान्हीं बाळं मातृहीन झालीं; हजारों घरांतले पोशिंदे काळाच्या दाढेखालीं रगडले गेले; गगनाला भेदून टाकणारे हजारों वृक्ष गवताच्या काड्यांसारखे वाहून गेले; हजारों जीवांना अन्न पुरविणाऱ्या शेतांचे तलाव बनले आणि हजारों लोकांचं अन्न त्यांच्या तळाशीं गाडलं गेलं. हजारों —

**श्री.** हजारों लोकांच्या अन्नाचा मुकुट डोकीवर चढवून हिंदूंचे शंकराचार्य आपल्या मठांत खुशाल चैन करीत बसले आहेत आणि आतां हजारों मिशनरी ख्रिस्ती त्या गरिबदुबळ्यांना दुःखमुक्त करण्यासाठीं धांवत जातील. असंच ना सुब्रह्मण्य ? चला तर. आपला हत्ती सजवून आणा. हजारों लोकांच्या अन्नाच्या त्याच्या रुपेरी अंबारींत बसून या अनर्थांची मौज पाहण्याकरितां आपण जाऊं चला.

**सुब्रह्मण्य.** संन्याशाला भूतबाधा होते असं मला वाटलं असतं, तर आपलं भाषण मला अयोग्य दिसलं नसतं. पण या प्रभातकालीं पूर्वीचं कांहींच कारण नसतां श्रींच्या मुखांतून निघणारे हे विचित्र उद्गार मला किती दुःखदायी वाटत आहेत.

**श्री.** पूर्वींचं कारण कां नाहीं ? तुम्हीं कालच माझ्यावर रागावून गेलां होतां ना ?

**सुब्रह्मण्य.** पण माझा राग आपल्या प्रेमळपणापुढं कुठं टिकला ?

**श्री.** ( त्याला कवटाळून ) सुब्रह्मण्य, तो प्रेमळपणा तुमचा—माझा नव्हे. तुम्हांला राग येण्याला पुरेसं कारण झालं होतंच. त्यांत तुमचा दोष नव्हता. या डोकीवरच्या मुकुटाखालीं माझा मेंदू दडपला गेला होता. मुळची वृत्ति त्या मुकुटाखालूनही उसळी मारून वर येऊं पाहत होती. त्यामुळं मुकुट आणि डोकं या दोहोंच्या युद्धामुळं मी तुमचा अपमान केला.

**सुब्रह्मण्य.** छेः छेः, मुळींच नाहीं. मीच आपला अपमान केला.

**श्री.** हा तुमचा विनय आहे. मलाच मुकुटाचा गर्व झाला होता. नाहीं तर सर्वाधिकारी मुकटावर बसूं न देण्याविषयींचा उद्गार माझ्या तोंडून कां निघाला असता ? संन्याशाच्या मस्तकावर सारं जग नाचलं तरी त्याला आनंद झाला पाहिजे. सुब्रह्मण्य, आपण दोघेही निरपराधीच आहोंत. हा सारा अपराध या मुकुटाचा आहे. तुम्हांला काय वाटतं ?

**सुब्रह्मण्य.** ( स्वगत ) खरंच. दुलारीवर प्रेम असतांही मी शंकराचार्यांच्या गादीची आशा धरली ती या मुकुटामुळंच काय ?

**श्री.** कां ? सुब्रह्मण्य, बोलत कां नाहीं ? हें सर्व अनर्थांचं मूळ मुळींच काढून टाकलं, तर फार उत्तम होईल नाहीं ? पहा, खिस्ती मिशनरी आतां पूरांत बुडालेल्या लोकांना मदत करण्यासाठीं धांवत जातील—

**सुब्रह्मण्य.** हो—डेव्हिड जोशी तिथं पुष्कळांना मदत करीत असलेला दिसला खरा.

**श्री.** आणि आम्हीं काय केलं ? बुडालेल्यांची नुसती कींव केली. आतां मिशनरी लोकांनीं मदत केल्यामुळं उपकारबद्ध होऊन सारा गाव बाटून खिस्ती झाला तर तो दोष कुणाचा ? ज्यांना तुम्हीं ‘ बाटे ’ असं अमंगळ विशेषण देतां ते बुद्धिपुरःसर बाटलेले नाहींत; त्यांना हिंदुधर्माचा वीट आलेला नाहीं. आपत्कालीं मदतीचा हात स्वतःच्या घरीं न मिळाल्यामुळं ते आपोआप पुढं आलेला दुसऱ्याचा हात धरून घराबाहेर निघाले. या पूरामुळं अनाथ झालेल्या जीवांसाठीं तुम्हीं काय करणार आहांत ?

**सुब्रह्मण्य.** ( बावरून ) काय करणार आहांत ? काय केलं पाहिजे तें मला मुळींच माहित नाहीं.

**श्री.** जा खिस्ती मिशनऱ्यांचा उपदेश घ्या. त्यांच्या पायाजवळ बसून परोपकारव्रताचा धडा घ्या. अनाथ हिंदूंना सनाथ हिंदू आपत्कालीं मदत करूं लागले, तर या हिंदुस्थानांत एकही हिंदू बाटून खिस्ती होणार नाहीं. खिस्ती मिशनऱ्यांना जसा खिस्ताचा वेदांत मुळींच कळलेला नाहीं, तसंच हिंदू बडबड्यांनीं उपनिषदांचं रहस्य पारखं करून घेतलं आहे.

दोघांनाही आपआपला धर्म कळलेला नाहीं; पण आम्हां हिंदूंपेक्षां ख्रिस्ती एका बाबतींत श्रेष्ठ आहेत, त्यांनीं ख्रिस्ताचा एक उपदेश आचरणांत आणला. ते गुड समॅरिटन ( Good samaritan ) बनले आणि आम्हीं ? आम्हीं आमच्या परंपरेचीं प्रेतं उराशीं कवटाळून उपाशीं मरत राहिलों आहोंत. हा मिशनऱ्यांचा दोष का ?

**सुब्रह्मण्य.** तर मग आज आम्हीं काय केलं पाहिजे ?

**श्री.** पूरांत बुडालेल्या गरिबदुबळ्यांना वांचवा, जा. पाद्यपुजेसाठीं म्हणून गरिबदुबळ्यांपासून श्रीमंतापर्यंत सर्वांच्या मुंड्या मुरगळून उकळेललं द्रव्य अनाथांना अन्न देण्यांत खर्च करा, जा. शंकराचार्यांच्या तिजोरीला देखील संन्यास द्या, जा.

**सुब्रह्मण्य.** तिजोरी खालीं केली तरीहीं मिशनऱ्यांशीं टक्कर द्यायला पुरेशी रक्कम उभी रहाणार नाहीं.

**श्री.** तर मग असं करा. हा मुकुट विका. दचकतां कां ? हा मुकुट विका. हें महावस्त्र विका. ( काढून ठेवतो ) पहा, मी आतां नुसता एकादा कॉलेज स्टुडंटच दिसतों नाहीं ? या रुपेरी पादुका विका. हें सिंहासन विका. हत्ती विका, त्याची अंबारी विका. भरझरी झुली-सकट घोडे विका. निशाणांचे जरीपटके विका. फार काय, पण पूजेचीं सोन्यारुप्याचीं उपकरणीं आणि देव्हाऱ्यांतले सोन्यारुप्याचे देवसुद्धां विका. या मठांत यापुढं पूजेचा बाण आणि श्रीशारदांबेची मूर्ति खेरीज सोन्याचा एक कण किंवा जराचा एक तंतूसुद्धां राहतां कामा नये. एवढंही होऊन जर पैशाची भरपाई होत नसेल तर हा मठ कोसळून पाडा आणि त्याचा प्रत्येक संगमरवरी दगड विकून पैसे उभे करा. बाहेर एवढे अनाथ अपंग उपाशीं मरत असतां हे संगमरवरी धोंडे उराशीं कवटाळून कुठला शंकराचार्य स्वर्गाला जाऊं शकेल ?

**किशोरी.** ( प्रवेश करून ) अहो शंकराचार्य स्वतः स्वर्गाला जाण्यापूर्वीं आधींच ज्यांनीं स्वर्ग गांठला आहे त्यांच्या पोराबाळांना मृत्यु-लोकीं जिवंत ठेवण्याचा कांहीं उपाय काढा.

**सुब्रह्मण्य** उपाय आधींच निघाला आहे. हा पहा श्रीनीं मुकुट सुद्धां विकायला काढला.

**किशोरी.** अस्सं ? आणि तुम्हीं स्वतः काय केलं ?

**सुब्रह्मण्य** मी ? हो खरंच मी ?

**किशोरी.** तुम्हीं हा मुकुट विकण्याची दलाली पदरांत पाडणार अहांत वाटतं ?

**सुब्रह्मण्य.** किशोरी, त्यागाच्या बाबतींत मी त्यागराजालाही हार जाणार नाहीं. हें पहा, माझं शिरोभूषण मी फेकून देतों. ही माझी भरजरी शालजोडी अनाथांना पांघरूण घालण्यासाठीं निघाली पहा. हे चालले रुपेरी खडाव पूरांत वहात—

**किशोरी.** शाबास सुब्रह्मण्य ! आतां दुलारीचा वल्लभ मला दिसून आला.

**श्री.** किशोरी, नीलाचलपीठाच्या शंकराचार्यांनं आपलं वचन पूर्णाशानं पाळण्याकरितांच ईश्वरानं हा पूर आणला. हा ईश्वरीकृपेचा पूर अनाथअपंग वैभवशाली मूढांसाठीं धावून आला आणि त्यांचं वैभवाचं पाप धुवून काढून नाहींसा झाला.

**किशोरी** खरंच, माझ्याही प्रेमाचं बावळं बुजगावणं त्याच पूरानं वाहून नेलं ( नमस्कार करून ) नीलाचलपीठाचा विजय असो.

**सुब्रह्मण्य** ( स्वगत ) त्यागाचा आनंद मोठा हृदयंगम असतो, यांत शंका नाहीं ( उघड ) श्रींच्या अनुज्ञेप्रमाणं हे साहित्य घेऊन आतां मी पुढील तयारीला लागतों. अहाहा ! हा भार वाहतांना आज मला केवढा आनंद होत आहे ! बा मुकुटा, आजपासून धर्मगुरूच्या मस्तकाला तूं अखेरचा रामराम ठोकलास खास. ( जातो. )

**किशोरी.** त्यागराज, या क्षणापासून मी तुम्हांला श्री म्हटलं पाहिजे.

**श्री.** श्री आणि संन्यास यांची आज कायमची ताटातूट झाली.

**किशोरी** तर मग आम्हां पंजाबीलोकांच्या वहिवाटीप्रमाणं मी आपणाला स्वामीजी म्हणूं का ?



किशोरी—आणि तुह्मीं स्वतः काय केलं ? पान ५६

The Manoranjan Press, Bombay.



दुलारी—साहेब सांगतात तसा त्यांना सलाम करा.        पान ६८

**श्री.** पूर्वपरिचयाचा संपर्क पार धुवून टाकून तें संबोधन उच्चारलेलं ऐकतांना मला आनंदच वाटेल.

**किशोरी.** तर मग स्वामीजी, डेव्हिडसाठीं आपण काय केलं आहे?

**श्री.** डेव्हिडसाठीं मी काय करणार नाहीं? डेव्हिडच्या परावर्तनांत माझा सारा जीव गुंतून पडला आहे. संन्याशानं वासनेचा त्याग केला पाहिजे हें मी जाणतों. पण ब्राह्मण होण्याची डेव्हिडची अनावर उत्कंठा पाहिली म्हणजे संन्यासाचे सारे धर्म विसरून माझी दृष्टी संसाराकडे वळूं लागते. किशोरी, हेंच विचारण्यासाठीं तूं मुद्दाम यावेळीं इकडे आली होतीस का?

**किशोरी.** असंच म्हटलं तरी चालेल. पूरांतल्या अनाथांची व्यवस्था झालेली पाहून त्या अनाथांना वाचवण्याचा प्रयत्न करणाऱ्या डेव्हिडची मला अर्थात् साहजिकच आठवण झाली.

**श्री.** बिचारा डेव्हिड, खरोखरच ब्राह्मण्याच्या अभावीं अगदीं मृतप्राय झाला आहे.

( मूर्च्छित डेव्हिडला घेऊन दुलारी व बिंदुमाधव प्रवेश करितात. )

**बिंदुमाधव.** पाहिलंत? बिचारा अगदींच मृतप्राय झाला आहे. अनाथांना वाचवितांना बिचाऱ्यानं स्वतःच्या जिवाकडेही पाहिलं नसावं.

**श्री.** (पाहून) आहे.-आशा आहे. ही नुसतीच मूर्च्छा आहेशी दिसते.

**दुलारी.** किती वेळपर्यंत तरी हे रस्त्यांत पडून राहिले असावे! पहा, सकाळच्या सूर्याच्या कोवळ्या किरणांनीसुद्धां यांचे कपडे वाळून गेले-

**किशोरी.** अरेरे! गरीब बिचारा!

**बिंदुमाधव.** (त्याचे हात वरखालीं करून) एवढंच सार्थक. आम्हीं नुसतं तोंडानं म्हणतों, 'अरेरे, गरिब बिचारा!' झाली आमची इतिकर्तव्यता! पण हा 'गरिब बिचारा' कां राहिला, याचा विचार कुणी करावा? सुब्रह्मण्यासारखे शंकराचार्यांचे सर्वाधिकारी पूरांतील अनाथांकडे ढुंकून पाहायलाही तयार नाहींत, शास्त्रीमंडळींना प्रातःस्नानसंध्येपुढं परोपकार आठवत नाहीं, पुट्टुपंडितासारखे कर्मठ ब्राह्मण पूर पाहतांच घरीं

पळतात; बिंदुमाधवाचीं पुराणीं हाडं पाण्यानं गारठतील म्हणून त्याच्या मुली त्याला अडवून धरतात; प्रत्यक्ष शंकराचार्यांनां तर सूर्यदर्शन होणंहीं मुष्किल झालं आहे; आणि ज्यानं आपल्या जिवाची पर्वा न करितां बुडल्यांना तारलं, तो रस्त्यांत धूळ खात पडतो. आणि परोपकारार्थ एवढे क्लेश सोसल्याचं बक्षिस काय ? तर ' अरेरे ! गरिब बिचारा ! '

**किशोरी.** परोपकाराचं बक्षिस या लोकीं मिळत नसतं.

**डेव्हिड.** ( भ्रमांत ) मी एकदां सांगतों, मी इडनगार्डनमध्यें येणार नाहीं. तुम्हांला वैकुंठाचा रस्ता माहित नाहीं म्हणतां ? मग ख्रिस्ताचे दूत कशाला झालांत ? किशोरी, किशोरी, देवदूतांऐवजीं मला न्यायला तूं कां नाहीं आलीस ?

**किशोरी.** किशोरी ?

**श्री.** किशोरी ? किशोरी, याचा अर्थ काय ?

**दुलारी.** ( डेव्हिडकडे बोट दाखवून ) याचा अर्थ किशोरी. याची संपत्ती किशोरी. समजलं ?

**किशोरी.** दुलारी; कुठं काय बोलावं एवढं तरी तुला कळतं का ?

**दुलारी.** कुठंही झालं तरी खरं दिसेल तेंच बोलावं, एवढं मला चांगलं कळतं.

**बिंदुमाधव.** दुलारी, खरं बोलायलादेखील केव्हां केव्हां काळ वेळ पाहावा लागतो, हें ध्यानांत ठेव. आपण जें खरं म्हणून बोलत असतों तें आमच्या मताप्रमाणें खरं असतं. तुमचंच तेवढं खरं म्हणून स्वीकारायला इतरांनीं तयार कां व्हावं ? प्रत्येकाला मतस्वातंत्र्य आहे; आणि त्या मतस्वातंत्र्यावर जबरदस्ती करण्याचा ईश्वरालासुद्धां अधिकार नाहीं. किशोरी, तो पंखा घेऊन डेव्हिडला वारा घाल. पाहिलंत, तो आतां बहुतेक सावध होऊं लागला आहे. ( सर्व बाजूला होतात. )

**डेव्हिड.** ( सावध होऊन ) अहाहा ! मी मेलोंच तर. सारा गांव पुरानं वाहून गेला. सुटलों. आतां इथं तरी धर्मभेदाचे आडपडदे मला अडथळा न करोत म्हणजे झालं. मरणाचं समाधान किती आनंददायी असतं !

**बिंदुमाधव.** ( एकीकडे ) हं—गप्प रहा. नाहींतर अचानक धक्क्यानं तो कायमचा भ्रमिष्ट होईल. किशोरी, तूं दूर रहा. ( पुढं होऊन ) डेव्हिड,—

**डेव्हिड.** ( नमस्कार करून ) अहाहा, गुरुजी, तुम्हींही इकडे आलांत ?

**बिंदुमाधव.** मी इकडेच आहें.

**डेव्हिड.** खरंच आहे. मृत्युलोकांत असतांनाहीं तुमचा आत्मा स्वर्गांत वावरत होता.

**बिंदुमाधव.** आणि अजूनही तो स्वर्गांतच वावरत राहावा, असं मला सदोदित वाटत असतं.

**डेव्हिड.** म्हणजे ? ( इकडे तिकडे पाहून ) हा स्वर्ग नव्हे का ? अरेरे ! हा तर मठ. हा त्यागराज, ही दुलारी. मी मेलों नाहीं तर ? अरेरे ! केवढा हतभागी मी !

**श्री.** डेव्हिड, तूं हतभागी नाहींस. तुझ्यासारखा भाग्यवान् या त्रिभुवनांत देखील कुणी नाहीं. आज तुझ्यामुळं केवढं मोठं कार्य झालं आहे ! पहा, केवळ तुझा स्वार्थत्याग शक्तिदायी झाल्यामुळं हिंदूंच्या शंकराचार्यांला वैभवाचं अवजड ओझं आज सहज झुगारून देतां आलं.

**डेव्हिड.** पण माझ्या मानेवरचं वधस्तंभाचं ओझं कसं खालीं उतरणार. गुरुजी, माझं मस्तक पुनः फिरूं लागलं, मला कुणी तरी सावरून धरा. ( पडतो )

**बिंदुमाधव.** जा दुलारी, डॉक्टरला घेऊन ये. आम्ही इथं आहोंत. श्रीनींही आतां आन्हिकासाठीं जावं हें बरं. ( पडदा पडतो )

---

## प्रवेश तिसरा.

( दुलारी प्रवेश करिते. )

**दुलारी.** ( स्वगत ) आतां मिशनहाऊसमधल्या डॉक्टरनांच आणलं पाहिजे. बरं झालं. तेवढीच पुन्हा एकदां मिशनहाऊसमध्यें जायची संधी मिळाली ! त्या गुलेलूसाहेबाला बराच वळवून आणला आहे. बायकांत

म्हणतात कर्तबगारी नाहीं. आम्हा बायकांनादेखील कांहीं चमत्कार करून दाखवतां येतात कीं नाहीं तें पाहायचं आहे! कुणीं म्हणतात, अशाच मुली सोडून कित्येक हिंदूना बाटवलं आहे. खरं असेल, किंवा खोटंही असेल; पण पुनः हिंदू करून घेण्यासाठीं हा उपाय कां योजूं नये? जशाला तशीच फेड करून दिली पाहिजे. मला माझ्या चारित्र्याची पूर्ण खात्री आहे, बाबांनाही माझी खात्री आहे. मग मी म्हणतें, गुलेलूसाहेबांना जरा झुलवून पुनः हिंदू करून कां घेऊं नये? आतां आमचे सुब्रह्मण्य कदाचित संशयपिशाचानं पछाडले जातील! जावोत. त्यांची तरी परीक्षा होईल! अल्पस्वल्पकारणावरून संशय घणाऱ्या पुरुषाची पत्नी होणं मला तरी कुठं रुचणार आहे? सुब्रह्मण्य रुसले, तर मी वेळींच बचावलें म्हणायची. न रुसले तर–तर काय तें ठरवायचं माझ्याही हातीं नाहीं आणि त्यांच्याही हातीं नाहीं. चला, डॉक्टर शोधतां शोधतां गुलेलूसाहेबांना थोडासा हिंदुधर्माचा घुटका देऊं. (जाते.)

---

## प्रवेश चवथा.

स्थळ—मठांतील एक खोली.

(डेव्हिड खाटेवर निजला आहे. किशोरी वारा घालित आहे.)

**किशोरी.** (स्वगत) भ्रमांत मनुष्य अंतरांतलीं रहस्यं व्यक्त करतो म्हणतात. केव्हां केव्हां भ्रमांत मनुष्य असंबद्ध भाषणसुद्धां बरळतो. मग यांतलं खरं कुठलं? काल बेसावध स्थितींत तरी यांनीं माझं नांव कां घेतलं? माझंच नांव घ्यायला कांहीं कारण झालं का? कां बरं ही शंका माझ्या मनांत येते? आलं सहज माझं नांव, असं समजून मी स्वस्थ कां राहूं नये? साहजिक घडलेल्या गोष्टीचा माझ्या मनावर एवढा मोठा परिणाम कां व्हावा?—

पद—(चाल–नाहक रार मचाय)

लाजवि राग जिवास। जिवावरिचा मातें ॥धृ॥
रसविरहिता श्वासें मृदुसुम हुंगितां।
मुकुलविकास विदारि तसा मातें लाजवि० ॥१॥

तें काहीं नाहीं. आतां याचा विचारच्च करायचा नाहीं. पण हे सावध होतांच्च काल बाबांनीं मला दूर कां केलं ? त्यांनाही कांहीं शंका आली का ? कसली शंका ? नको तो विचार ! नुसतं माझं नांव घेतलं—

**डेव्हिड.** ( जागृत होऊन ) किशोरी—

**किशोरी.** ( स्वगत ) पुनः तेंच ! ( उघड ) ही मी इथंच्च आहें. थांबा. उठूं नका. डॉक्टरला आणण्यासाठीं दुलारी गांवात गेली आहे. (वारा घालते) गांवच वाहून गेल्यावर डॉक्टर कुठून मिळणार कोण जाणे !

**डेव्हिड.** किशोरीदेवी, या पतित खिस्त्याची तुम्हीं सारीजणं एवढी काळजी कां घेतां ? हिंदूलोक आमच्या स्पर्शाचा विटाळ मानतात. तुम्हीं हिंदूच्च आहांत ना ?

**किशोरी.** आम्हीच्च हिंदु आहोंत. ईश्वराला आम्हीं पतितपावन म्हणतों. पतिताच्या स्पर्शानं भ्रष्ट होणारे मुळीं हिंदूच्च नव्हत. आमचा ईश्वर पतितांना पावन करून घेता मग आम्हींच्च मात्र त्यांना अपवित्र कां मानूं ! पण मिस्टर जोशी, मी इथं असल्याचं माहित नसतांही आतांच्च तुम्हीं मला कां हाक मारलीत ?

**डेव्हिड.** ( स्वगत ) बेसावधपणानं घात केला. भ्रमांत मी काय बरळलों कोण जाणे. सारंच रहस्य तर बाहेर पडलं नाहीं ना ? ( उघड ) किशोरीदेवी, बुडत असतांना माझ्या मेंदूवर कांहीं तरी चमत्कारिक आघात झाला आहे, त्याचाच तो परिणाम असावा. यापूर्वीच्च माझं मस्तक थोडंसं ठिकाणावर नसे आणि त्यांत हा बुडण्याचा आघात.

**किशोरी.** पण त्याचा परिणाम इतका अचुक कसा होतो ? काल बेशुद्ध स्थितींत तुम्हीं तीन वेळां माझं नांव घेतलंत. हा नुसत्या मेंदूवरच्या आघाताचा परिणाम दिसत नाहीं.

**डेव्हिड.** माझ्या हृदयावरही आघात झाला आहे खरा.

**किशोरी.** असेल-तुमच्या हृदयावरही आघात झाला असेल. पण तुम्हीं माझंच नांव का घेतलंत ? दुलारीचं नांव का घेतलं नाहीं ? मी कुमारी आहें, अविवाहिता आहें, तुमचा माझा प्रत्यक्ष परिचयसुद्धां नाहीं. तुम्हीं माझं नांव घेणं योग्य होईल, असं तुम्हांला वाटतं का ?

**डेव्हिड.** किशोरीदेवी, जगाच्या आघातानं हृदय फुटून गेलेला मी एक दुबळा जीव आहें. सारींच मला टाकून बोलतात. तुम्हींही त्यांचंच अनुकरण करीत अहांत हें माझ्या दुर्दैवाला अनुरूपच आहे.

**किशोरी.** दुर्दैवाच्या पांघरुणाखालीं चोरट्या मनाच्या चोरट्या भावना झांकून झाकल्या जात नसतात; वस्त्रांतल्या निखाऱ्यासारख्या त्या केव्हांना केव्हांतरी बाहेर येणारच. मिस्टर जोशी, आम्हा बायकांची दृष्टि एक्स रे (Xray) पेक्षांही भेदक असते. आमच्याकडे मनांतलं मन देखील चोरून ठेवणं शक्य नसतं.

**डेव्हिड.** असंच असेंल, तर ते माझ्यावर मोठे उपकार होतील. जगाच्या दृष्टीनं अप्रिय भासणारी अतिप्रिय गोष्ट उघड बोलून दाखविण्याचे तेवढे कष्ट तरी वांचतील.

पद. ( चाल—जानकीराम राजाकी ).

वांच्छिता भावना झालि हिमकणशी उगम येतां ॥
सदा मुकुलिता दिसलि । कलि जरि कोमल आतां ।
कुठे रात्रि विराजतां ॥ १ ॥

**किशोरी.** मिस्टर जोशी, तुम्हीं काय बोलत अहांत तें तुम्हाला कळलं का? मी ब्राह्मणाची मुलगी आहें. तुम्हीं —

**डेव्हिड.** मीही ब्राह्मणच आहें.

**किशोरी.** तुम्हीं ख्रिस्ती अहांत.

**डेव्हिड,** मुळींच नाहीं. त्यागराजाला विचारा, तोही असंच सांगेल. तुम्हीं प्रथमच या मठांत आलांत, त्यावेळीं त्यानं मला मुक्तकंठानं हेंच सांगितलं.

**किशोरी.** त्यागराजांनीं काय वाटेल तें सांगितलं, पण जगानं तें कुठं कबूल केलं आहे.

**डेव्हिड.** मला जगाशीं काय करायचं आहे? जग जर मला आपला म्हणत नाहीं, तर मी उगीच जगाला कां कवटाळित बसूं? पण किशोरीदेवी, तुम्हांला काय वाटतं?

**किशोरी.** बाबा म्हणतात, तुम्हीं परावर्तनाला पूर्णपणें पात्र आहांत. बाबांच्या शब्दांवर माझा विश्वास आहे.

**डेव्हिड.** तर मग आतांच तुम्हीं मला खिस्ती कां म्हटलंत? जिव्हाळ्याच्या माणसांनीं खिस्ती म्हटलं, तर मला मरणप्राय दुःख होत.

**किशोरी.** पण तुमचा आणि माझा जिव्हाळ्याचा संबंध कुठं आहे?

**डेव्हिड.** नुसत्या नात्यानं किंवा जातीनंच जिव्हाळ्याचा संबंध जुळत नसतो. तसा जिव्हाळा नसता तर मला परक्याला वारा घालित तुम्हीं इथं कां राहिलां असतां?

**किशोरी.** बाबांची आज्ञा पाळणं हाच माझा धर्म आहे.

**डेव्हिड.** जगांतले सारेच व्यवहार काहीं वडिलांच्या अनुज्ञेनं होत नसतात. प्रत्येक जीवाच्या आयुष्यांत असा एक काळ येतो कीं, त्या वेळीं वडिलांपासून ईश्वरापर्यंत आज्ञा देणाऱ्या सर्व समर्थ व्यक्ति असमर्थ होऊन जातात.

**किशोरी.** जगातील अनाथ अपंगांवर दया दाखवणं, हाच खरा मानवधर्म आहे.

**डेव्हिड.** जग! कुठं आहे जग? किशोरीदेवी, हें सारं जग आपल्याच हृदयांत असतं. तें हृदयासकट बाहेर काढून आम्हींच जिकडे तिकडे उधळून देतों. त्या आमच्याच हृदयाच्या प्रत्येक परमाणूंचीं बाहुलीं बनवून त्यांना आम्हींच निरनिराळीं नांवं देतों; आणि त्यांच्यावरच परकेपणाचा आरोप करतों. त्यांतलेच कांहीं परके घेऊन आपण त्यांना मग आपले म्हणतों; आणि याच आपलेपणाच्या भावनेला आम्हीं प्रेम असं नाव देऊं लागतों. म्हणूनचः—

पद. (चाल—मोरि नाहीं चले).

प्रेम कांहीं कळे। जगाचें। निजमनिं जग जें मावळे ॥ धृ० ॥
निरखुनि जगता हृदयतलींच्या। समता साधिति आत्मबळें ॥ १ ॥
निरोविति ममता असुखमुखाचो। झरतां लोचनबिंदुजलें ॥ २ ॥

**किशोरी.** या प्रेमाविषयीं तुम्हीं बराच विचार केला आहेसं दिसतं!

**डेव्हिड** जगानं माझ्याशीं अप्रेम धरल्यामुळं प्रेमाचा विचार करण्यानच मी जिवंत राहिलों आहें. सर्वत्र प्रेमाचाच अभाव भासूं लागल्यामुळं केवळ प्रेमाचाच विचार करण्यांत मला समाधान मिळतं. मी मात्र प्रेमाची दृष्टी ठेवावी आणि माझ्या प्रेमानं माझ्या उमोर रागान डोळे फाडावे, हें माझं दुर्दैव कीं सुदैव? प्रेमाच्या भुकेनं व्याकुळ होऊन मी जिथं धावत जातों, तिथंच माझ्यावर परकेपणाची लाथ बसते. किशोरीदेवी, या माझ्या दुर्दैवामुळं देखील तुम्हांला माझी दया येत नाहीं का ? अजूनही तुम्हीं मला खिस्ताच म्हणणार का ?

**किशोरी.** मिस्टर डेव्हिड, मला तुमची फार कींव येते.

**डेव्हिड.** मी खिस्ती असतों तर यावेळीं तुमच्या पुढं गुडघेच टेकले असते.

**किशोरी.** ( हंसून ) आपण खिस्ती नाहीं ही भावना तुम्हीं अगदीं जिवाशीं जखडूनच ठेवली आहे म्हणायची !

**डेव्हिड.** तरीही हिंदूंचे आचार मला पूर्णत्वानं माहित नाहींत. ते मला माहित असते तर दयेच्या एकच शब्दासाठीं हा जीव या पायावरून मी कुरवंडून टाकला असता. मृतप्राय झालेल्या या जीवाला एकाच शब्दानं शक्तिमान् करणाऱ्या उद्धारकर्त्या देवतेला मी नमस्कार केला असता.

**किशोरी.** ( दूर सरून ) छीः छीः ! हें काय ? मला कसला नमस्कार करतां ?

**डेव्हिड.** हा मनोभावनेचा प्रश्न आहे.

**पद —( राग–आभीं–ताल–दादरा ).**

धूलियुता पदिं तुझ्या पापनाश या जनास ॥ धृ० ॥
नाहिं दुजी काहिं वासना । ठाव चरणिं विभव मजासि ॥ १ ॥
देवहता हीच भावना । देव दिसाले सदय रमणी ॥ २ ॥

हृदयाची उदारता जागी झालेली दिसलीं कीं, ती पुढं कुणाचीही मान वांकलीच पाहिजे.

( तो नमस्कार करूं लागतो. ती त्याला हातानं दूर करते ).

**किशोरी.** ( स्वगत ) किशोरीच्या कठोर हृदया, भावप्रवणतेनं असं चळूं नकोस.

**डेव्हिड.** ( तिचा हात सोडून ) तुझी पायधूळ लागावी एवढं सुद्धां भाग्य माझ्या कपाळीं नसावं ना ? अरेरे ! पूरांत वाहून मी मेलों असतों तर फार चांगलं झालं असतं.

**श्री.** ( प्रवेश करून ) हा त्यागराज जिवंत असेपर्यंत ब्राह्मण झाल्याशिवाय डेव्हिड मरणार नाहीं. वाः किशोरी, चांगली शुश्रूषा करतेस ! याला जाग्यावरून उठूं कां दिलंस ?

**किशोरी.** स्वामीजी, मी यांना स्पर्श केला. मी स्नान केलं पाहिजे का?

**श्री.** काय म्हटलंस ? स्नान केलं पाहिजे का ? किशोरी, या डेव्हिडचा असा हात धरून या मठाचा उंबरठा ओलांडतांना नीलाचलपीठाचा शंकराचार्य स्वतः पावन होत आहे. ( दोघे जातात. )

**किशोरी.** काय झालं हें ? या स्पर्शानं मी पतित झालें कीं पावन झालें ? हिंदुधर्माच्या उदारतेबद्दल मी आतांच किती लांबलांब गोष्टी सांगितल्या; आणि आतांच त्यांचा स्पर्श झाला म्हणून स्नान करण्याची कल्पना माझ्या मनांत आली ! कुसंस्कारामुळं मन दुबळं होतं तें असंच. त्यागराजांच्या धैर्याची मात्र खरोखर कमाल आहे. सारं जग विरुद्ध जाऊं पहात असतांही डेव्हिडचं परावर्तन करण्याचा त्यांचा निश्चय नुसता डळमळतसुद्धां नाहीं; आणि मी ? वैभवासाठीं मी त्यागराजांना टाकून बोललें. माझ्या एका शब्दासरशीं त्यांनीं एवढ्या ऐश्वर्यावर एका क्षणांत लाथ मारली. त्याच त्यागराजांच्या शब्दाचा माझ्यावर कांहीं तरी परिणाम झाला आहे का ? त्यांचीं हीं सारीं मतं बाबांच्याच शिक्षणानं तयार झालीं आहेत ना ? मग त्याच बाबांच्या मुलीच्या मनांत डेव्हिडविषयीं नुसती सहानुभूतीसुद्धां कां येऊं नये ? त्यागराजांच्या संन्यासामुळंही माझ्या मनावर आघात झाला होता. आघात कसला तो ? मी त्या वेळीं नुसती चिडून गेलें होतें; आणि आतां ? [सुस्कारा टाकून] कांहीं कळत नाहीं. मन कसं बधिर होऊन गेलं आहे. मी कुठं वाहवत आहे ही ?

पद ( चाल-लागे लागि मोरि बिंदिया ).

का न जागे मनिं ममता तळमळ लागे ॥ ध्रु० ॥
शैलसमा शिला हृद्या बांधितां । यौवनकण कसला जगे ॥ १ ॥
स्वैरकरा प्रभा प्रणया जाळितां । त्यागचि रविसम हा तगे ॥ २ ॥

---

## प्रवेश पांचवा.

## स्थळ-मिशनहाऊस.

( मालन आणि ममता )

**ममता.** काय ग झालं तुला इतकं वाईट वाटायला ? डेव्हिडराव आजारी पडले म्हणूनच ना ? त्यांना तिकडे काय कमी आहे ? मठांत त्यांची व्यवस्था चांगली होईल. ते हिंदूंचे बिशप त्यांचे म्हणे मित्र आहेत. आमच्या गोऱ्या डॉक्टरनां देखील त्यांनीं फी भरून नेलं. आतां तूंच एवढी काळजी करून काय करणार आहेस ?

**मालन.** तसं नव्हे ग. ते बरे होतील-अगदीं साफ बरे होतील; पण गुलेलुसाहेब फार रागावले आहेत, त्यांचीच मला भीति वाटते कदाचित् त्यांना नोकरीवरूनसुद्धां काढून टाकायचे.

**ममता.** बरं, काढलं नोकरीवरून. म्हणून काय होणार ? डेव्हिडराव एम्. ए. आहेत, त्यांना कुठंही सहज नोकरी मिळेल; आणि नाहीं मिळाली म्हणून काय झालं ?

**मालन.** भलतंच. माझं त्यांच्यावर प्रेम आहेना ?

**ममता.** प्रेम असलं म्हणून काय झालं ? त्यांनीं एवढा मोठा गुन्हा कां करावा ? रविवार म्हणजे शब्बाथचा पवित्र दिवस. त्या दिवशीं काम करायचं म्हणजे काय ? कांहीं धर्मशास्त्र पाळलं पाहिजे कीं नाहीं ?

**मालन.** जळळं तें धर्मशास्त्र. रविवारीं कुणी जेवित नाहींत वाटतं ? कुणी मरत असलं तरी त्याला वांचवण्यासाठीं देखील रविवारीं औषध नाहीं द्यायचं वाटतं ?

**ममता.** अग वेडे, धर्मशास्त्राची तशी आज्ञा आहे ना ?

**मालन.** धर्मशास्त्राच्या आज्ञा सदोदित उलटसुलट असतात. एकीकडे असतं, असंच वागावं; आणि दुसरीकडे असतं, तसंच वागूं नये. आग लाव त्या साऱ्या शास्त्रांना !

**पुट्टू.** ( प्रवेश करून ) अग चांडाळणी, काय बोलतेस हें ? शास्त्रं जाळलीं तर–आमच्या काय किंवा तुमच्या काय–पुरोहितांचीं पोटं कशीं भरतील ? 'अग्निमीळे पुरोहितं' पुरोहित आहेत म्हणूनच लोकांना अग्नि मिळतो. नाहींतर जेवण कसं शिजेल ?

**ममता.** जेवणाचं कांहीं सांगतां येत नाहीं. पण पुरोहितगिरीमुळं तुमची डाळ चांगलीच शिजते खरी !

**पुट्टू.** अग, आम्हींच अग्नि आहोंत. 'अह वैश्वानरो भूत्वा.'

**मालन.** आगच कां ? तुम्हीं बजाग आहांत.

**पुट्टू.** येऊंद्यात साहेब, म्हणजे समजेल आग आणि बजाग.

**ममता.** हे पहा साहेब आले. ( गुलेलु येतो. )

**गुलेलु** ममते, मालनशीं तुझा संयोग कां व्हावा ? हा तुझा अधिकार नसावा, पण जे केवळ येथें असतात त्यांचा नाहीं, तर माझ्याठायीं प्रीत झाले असतां जो विश्वास, त्याला अनुसरून जे चालतात, त्यांचा.

**ममता.** मी कांहीं मालन नाहीं. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे.

**गुलेलु.** पहा मालन, अगे धिक्कारणारे, पहा – आणि आश्चर्य मान आणि नाहींशी हो, कांकीं, मी तुझ्या काळांत एक कार्य करितों.

**पुट्टू.** लग्नकार्याचा बेत आहे वाटतं ?

**ममता.** कुणाचं लग्न ? ही मालन साहेबांची बायको होणार कीं काय ? अगबाई, मालन, बरीच आहेस कीं ग ! मला काहींच दाद लागूं दिली नाहींस !

**पुट्टू.** हं–होऊन जाऊंद्या लग्न, म्हणजे आम्हांला तरी जंगी जेवण मिळेल.

**गुलेलू.** म्हणजे ? तुम्हीं येथें जेवण करावें असें व्हावें ?

**पुट्टू.** जेवणच कां ? नुसतं तुमचं तें हें-( खुणेनें दाखवितो ) तेवढंच असलं तरी चालेल. फार पौष्टिक असतं तें ! क्षयी माणूस देखील त्याच्या कषायानं आराम पावतो.

**गुलेल्लू.** अरेरे ! तुमची आशा व्यर्थ व्हावी. आज बारा वर्षं होत जात गेलीं, मी मांसमद्य वर्जिलें आहे. कांकीं, मी व्हेजिटेरियन समीतीचा सदस्य झालों असावें.

**पुट्टू.** अस्सं. एकूण तुम्हीं बारा वर्षं ब्राह्मणच आहांत म्हणायचे.

**ममता.** आणि तुम्हीं केव्हांपासून हें सुरू केलं ?

**पुट्टू.** एकदां मी आजारी पडलों होतों. डॉक्टरनीं औषध म्हणून दिलं. करतां काय ? घेतलं. 'औषधी जान्हवी तोयं.' ताम्रगंगेचा एक घुटकाही घ्यावा लागला. आतां लागली संवय ! जान्हवी तोयं म्हणजे गंगेचं पाणी समजून घेतों. 'गंगा गंगेति यो ब्रूयात्'—पाप म्हणून लागायचंच नाहीं. 'त्वं नामं नरकांतकारिणिवरं मत्स्योथवा कच्छपः' गंगेचं पाणी पोटांत जातं. करतां काय ? गंगेच्या पाण्यांत देखील मत्स्य असतात. तेही गंगेच्या पाण्याबरोबर जातात पोटांत. असा चमत्कार आहे बघा.

**दुलारी.** ( प्रवेश करून ) असा चमत्कार आहे ! कसं पुट्टूपंडीत ? असा चमत्कार आहे.

**पुट्टू.** 'त्रेधा निदधे पदं' तूं पाऊल टाकतांच त्रेधा उडवलीस खरी ! चोरून ऐकणं मोठं वाईट बरं, दुलारी.

**दुलारी.** चोरून मद्यमांस खाण्यापेक्षांही वाईट का ?

**पुट्टू.** अग पण मी दररोज पंचगव्य घेतों ना !

**गुलेल्लू.** पंचगव्याला हाय हाय ! दुलारीबाई, आमचें शास्त्र म्हणतें, 'पवित्र चुंबनानें एकमेकांस सलाम करा.' मग ? दुलारीबाई, मग ?

**दुलारी.** पुट्टूपंडीत, या. साहेब सांगतात तसा त्यांना सलाम करा.

**पुट्टू.** म्हणजे ? मी साहेबांचं चुंबन घेऊं कीं काय ?

**दुलारी.** काय हरकत आहे ? परवां पाणिग्रहणासाठीं तळमळत होतां; आणि आतां चुंबन नाहीं घ्यायचं वाटतं ?

**गुलेल्लू.** दुलारीबाई, आचाराच्या नवीकरणानें तूं स्वरूपांतर पावावें. यासाठीं कीं, माझी इच्छा तूं पारख करावी.

**मालन.** असं भलभलतं बोलूं लागलां कीं, सारं जगच तुमची पारख करील.

**गुलेल्लू.** चूप. मालन, बोलूं नकोस. कांकीं, आमची निंदा होत असतांही आम्हीं विनावितों. जगाचा गाळ, सर्वांचे निपटारे, असे आम्हीं आजपावेतों झालों नाहीं. ममते, हिला घेऊन तूं येथून निघून जावें.

**मालन.** दुलारीबाई, डेव्हिडरावांची काय खबर आहे ?

**दुलारी.** इतक्यांतच ते इथं येतील. तेंच सांगायला मी आलें आहें.

**गुलेल्लू.** हिच्यासमोर तुम्हीं कांहीं न सांगावें. मालन, ममते, जाव्, चले जाव् !

**मालन.** देव तुमची राखरांगोळी करो. काय मेला छळ ! मी आतां आपली हिंदुच होतें कशी.

**ममता.** चल—उगीच काहीं तरी बोलूं नकोस. ( तिला घेऊन जाते. )

**पुटू.** छे: डेव्हिडनं फारच मूर्खपणा केला. शास्त्राविरुद्ध आचरण म्हणजे काय ? अब्रह्मण्यं—नव्हे नव्हे—अख्रिस्त्यण्यं ! अख्रिस्त्यण्यं !

**गुलेल्लू.** बोलावें, दुलारी, बोलावें. तुझ्या मधुरवचनानें माझें कर्णरंध्र तृप्तावें. ( डेव्हिड येतो ) ( स्वगत ) आतां कसें व्हावें ? हें विघ्न कां यावें ? याला आज डिस्मिस् करावें हेंच योग्य.

**डेव्हिड.** माझी हकिकत कळली ना आपल्याला ? नाइलाजानं मला गैरहजर राहावं लागलं.

**गुलेल्लू.** डेव्हिड, तूं मला सलामिलें कां नाहींस ?

**दुलारी.** ( जवळचें बायबल उचलून ) हें पहा साहेब, ‘ सभास्थानामध्यें श्रेष्ठ आसनें व चव्हाट्यांवर नमस्कार घेणें, हीं तुम्हांस आवडतात. तुम्हांस हाय हाय ! ’

**पुट्टू.** दुलारी, तुला काय करायचं आहे बायबल्शीं ! तूं हिंदु आहेस.

**दुलारी.** बायबल् मला गीते इतकेंच आदरणीय वाटतं. म्हणून मुद्दाम मी हा सलामनिषेधाचा आधार बायबलांतूनच दाखविला.

**गुलेल्लू.** पुट्टू पंडीत, चालते व्हा येथून. तुमचें दर्शन यावेळीं नसावें. चला.

**पुट्टू.** जसा हुजूरचा हुकुम. ( स्वगत ) जरा बसायला मिळतं तर गंमत पाहायला मिळाली असती; पण हुकमापुढं नाइलाज. गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ ! ( जातो )

**गुलेल्लू.** डेव्हिड, तूं अदूष्य आहेस असें तुला कां वाटावें ?

**डेव्हिड.** कोणतीही दूषणीय गोष्ट माझ्या हातून कधींही घडली नाहीं.

**गुलेल्लू.** गैरहजिरी दूष्य नव्हे काय ?

**डेव्हिड.** मी आजारी होतों.

**गुलेल्लू.** तूं आजारी कां व्हावें ? शब्बाथाच्या पवित्र दिवशीं काम करून कां बुडावें ? तूं आज शब्बाथ मोडिलास, उद्यां नाटक पहायासही जाशील, असं होईल ! तुम्हां लोकांना हें कसें न कळावें कीं, तुम्ही आपले नव्हां. कारण तुम्हीं मोलानें विकत घेतले अहां. नोकरानें केव्हांही आजारी न पडावें.

**डेव्हिड.** नोकर मनुष्य नव्हे का ? नोकराचा देह हाडांमासाचाच असतो ना ?

**गुलेल्लू.** पण तूं पूरांत कां बुडावें ?

**डेव्हिड.** मी मिशनचंच काम केलं. बुडत्यांना तारण्याचा प्रयत्न करण्यासाठींच मिशन आहे ना ?

**गुलेल्लू.** अपंगाना मदत द्यावी, कांकीं, तेंच मिशनचें कार्य आहे; पण त्यांतील कितीकांना तूं पवित्रशास्त्र उपदेशिलेंस ?

**डेव्हिड.** त्याखेरीज मिशनवर्क होत नाहीं वाटतं ?

**गुलेल्ल.** बहकलेलीं कोंकरें फिरून कळपांत यावीं, पवित्रशास्त्र उपदेशिणें नुसते नका. तुझें कर्तव्य तूं मुळींच न केलें. कांकीं, पहा, मठांतील लोक सर्वांना मदत करायास धांवत जावे; आणि आमचें काहींच कार्य न व्हावें, असें कां व्हावें ?

**डेव्हिड.** मला तरी तसं कां वाटावं ? तीन वर्षांचा मुलगा असतांना मी इकडे आलों. सोळा वर्षांचा होईपर्यंत मला टोपीसुद्धां माहित नव्हती. माझ्या आणि कैद्याच्या पोषाखांत काय फरक होता ? कशाला जास्त बोलूं ? कसंवसं कां होइना पण ज्यांचं अन्न खाल्लं त्यांची केव्हांही मी निंदा करणार नाहीं. तरीही हिंदूंनीं खिती व्हावं, असं मला मुळींच वाटणार नाहीं.

**दुलारी.** ( स्वगत ) शाबास ! ब्राह्मणोत्तमा, शाबास !

**गुलेल्ल.** अपवित्रा, काय हें भाषण ! तुझ्या आढ्यतेला हाय हाय ! तूं नियमशास्त्राधीन रखवालींत ठेवलेला होतास हें तूं विसरावें, हें आश्चर्य असावें ! हें आढ्यता मिरविणें शोभत नाहीं. थोडें खमीर सगळ्या गोळ्याला फुगवितें; हें ध्यानांत असावें. बिगरहुकुम गैरहजिरीनें तूं आपली नोकरी मुकलास. जा, चालता हो.

**डेव्हिड.** धन्य ईश्वर ! गुलेल्लसाहेब, कळून किंवा नकळून मी तुमचं मन दुखविलं असल्यास मला क्षमा करा.

**गुलेल्ल.** आतां क्षमा व्यर्थ झाली.

**डेव्हिड.** तुमचा गैरसमज झाला. पुन्हां नोकरी मिळण्यासाठीं मी मुळींच क्षमा मागितली नाहीं. तुमची माझी ही शेवटची भेट आहे, म्हणूनच मी क्षमा मागितली. मला ही नोकरी नको; आणि यापुढं हा संबंधही नको. ही रुपेरी बेडी आपोआप तुटली, यांत मला आनंदच आहे. मी आतां जातों. पण एवढं माझं शेवटचं सांगणं ध्यानांत ठेवा, हिंदुजनता जागी झाली तर तुमचा बाजार एकदम बंद होईल.—

पद.—( चाल—नेवर बाजोरे. )

हे जनता, नता जागतां वितरि पात्रता अमरसारता ।
परसुखरता सदा विनता माता ॥ ध्रु० ॥ प्रणतनाथ अरि काय अनाथां ।
धर्म पसरितां रिपुता धरितां । जो त्यजि स्वपरजन भावा ।
तरि विभु देइ तया हाता ॥ १ ॥ ( जातो. )

**गुलेलू.** ( स्वगत ) यांत मी काय समजावें ? माझें मन असें कां व्हावें ? दुलारीला आतां काय वाटावें ?

**दुलारी.** हें काय ? बोलत कां नाहीं ? मला काल या कशाला म्हटलंत ? बोला गडे, बोला.

**गुलेलू.** ( स्वगत ) अहाहा ! आतां जरा रुसावेंच. (पाठ फिरवून) धन्य माझें सौंदर्य !

**दुलारी.** मला तिष्ठत कां ठेवतां ? जाऊं का मी ? असं काय बरं ?

पद—( चाल मुखसे ना बोलो )

रुसवा कां झाला । आतां एकवार बोला ॥ ध्रु० ॥
मधुवचन-विहारीं विचराया । जैं आलें विरालें ॥ १ ॥
नच अवधि विचारा विसराया । कां भ्यालां जगाला ॥ २ ॥

**गुलेलू.** ( गुडघे टेंकून ) प्रिय दुलारी, हा दास तुला नम्र व्हावा. तूं याला प्रीत व्हावें, हाच माझा एकांत.

**दुलारी.** एकाचा अंत झाल्याशिवाय एकांत कसा होईल ? हें काय? तुम्हीं माझ्या पुढं कां गुडघे टेकतां ? मूर्तिपूजकांना दगडाच्या पुतळीपुढं नमस्कार करतांना पाहून तुम्हीं तिट्कारा दाखवितां; आणि आतां नुसत्या प्रेमासाठीं हाडामासाच्या पुतळीपुढं गुडघे टेकतां ? ही नव्हे वाटतं मूर्तिपूजा ?

**गुलेलू.** तुझ्या प्रेमासाठीं मी तुझी मूर्ति पूजित करिन.

**दुलारी.** पण माझी एक अट आहे.

**गुलेलू.** तुझ्या प्रीतीने वेडा होऊन मी नियमशास्त्राचीं उल्लंघनें करावीं, हाच माझा धर्म. कांकीं, शास्त्र म्हणतें, 'पुरुषत्व दाखवा. खंबीर व्हा. तुमचें सर्व कांहीं प्रीतीनें व्हावें.'

**दुलारी.** माझं प्रेम तुम्हांला पाहिजे असेल तर आधीं ही भाषा सुधारा.

**गुलेलू.** पवित्रशास्त्राच्या भाषेचा मी अनुकारी आहें, असा मला मोजा.

**दुलारी.** पण तुमचं शास्त्रच म्हणतं, 'तुम्हांमुळं विदेशी लोकांत देवाच्या नांवाची निंदा होते.' ती असल्या वेडगळ भाषेमुळंच ना? ही भाषा नसती तर बायबलची कुणीही थट्टा केली नसती. बरं, माझं प्रेम तुम्हांला पाहिजे ना! तर मग आधीं शुद्ध बोला.

**गुलेलू.** तुझ्या प्रेमासाठीं मी पात्र व्हावें, अशी भाषा प्रयत्न करितांना मी नवीकरणानें भाषांतर होईन.

**दुलारी.** तसं झालं तरच खरं भाषांतर. नाहींतर भाषेंत अंतर पडलं तर मग त्यांत काय पुरुषार्थ! आतां मात्र मी सुखी झालें. कारण —

( **गजल.** )

सुखाचा शोध लावाया। वहावें प्रेम कोणाला॥
कुणाला सौख्य प्रेमाचें। कुणाला आवडे ज्वाला॥ १॥
जयानें अग्निला भ्यावें। तयानें प्रेम विसरावें॥
कुणि का लावि ओठाला। सुखाचा जहरिला प्याला॥ २॥
कुणाला प्रेम आकाशीं। फुलांचे बोल कोणि वदे॥
कुणाला कावळा मोही। कुणाला प्रेम बुलबुल् दे॥ ३॥

( जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

### स्थळ—मठ.

( आसनस्थ श्री, दोन्ही बाजूला सुब्रह्मण्य व बिंदुमाधव. खालीं—इतर शास्त्री मंडळी व पुट्टु पंडित. डेव्हिड अगदीं बाजूला बसलेला.)

**सुब्रह्मण्य.** ( उभा राहून ) सर्व शास्त्री, पंडित, नैय्यायिक, तार्किक, वार्तिक, पुरोहित आणि इतर ब्रह्मवृंदहो, आज आपल्यासमोर

एक फारच महत्वाचा वादग्रस्त प्रश्न येत आहे. संस्थानदेवतेपुढं डेव्हिड गंगाधर जोशी नामक एका ख्रिस्ती तरुणानं आपल्याला हिंदुधर्मांत घेण्याविषयीं विनंतीपूर्वक अर्ज सादर केला आहे. सदर अर्जाला संस्थानदेवतेला गुरुस्थानीं असणारे वेदशास्त्रसंपन्न बिंदुमाधव शुक्ल यांनीं एक शिफारस जोडली आहे. त्यांनीं दयानंदादिकांचे आधार दाखवून पतितपरावर्तन सप्रमाण सिद्ध करण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे. आमच्या मतें सदर सर्व प्रमाणें आधुनिक आहेत. श्रुतिस्मृतींचा कोणताही आधार सदर पुरवणींत नोंद केलेला नाहीं. सदर डेव्हिड जोशी हे नुसत्या परावर्तनावर तृप्त नाहींत, त्यांना ब्राह्मणत्व पाहिजे आहे; म्हणूनच आज अखिल ब्रह्मवृंदाला संस्थानदेवतेकडून पाचारण करविणं प्राप्त झालं. या पाचारणाला मान देऊन आज अखिल ब्रह्मवृंदाचं मठांत आगमन झालं, याजबद्दल संस्थानदेवतेला फार आनंद झाला आहे. आतां या वादग्रस्त प्रश्नाबद्दल विचार झाला पाहिजे.

पुट्टू. सभेच्या कार्याला सुरवात होण्यापूर्वीं अखिल ब्रह्मवृंदाच्या तर्फे मला एक प्रश्न करायचा आहे. आज या सभेला हजर असतांना संस्थानदेवतेनं मुकुटमहावस्त्रादिकांचा कां अव्हेर केला? मुकुटाशिवाय आम्हीं संस्थानदेवतेला कसं ओळखावं?

**बिंदुमाधव.** कांहीं विशिष्ट कार्यासाठीं मुकुटादि मूल्यवान् जिनसांचा संस्थानदेवतेला विक्रय करणं भाग आलं.

**१ शास्त्री.** या गोष्टीला सर्वाधिकारी संमती देत आहेत काय?

**सुब्रह्मण्य.** माझ्याच संमतीनं सदर विक्रय झालेला आहे; आणि तसं करणं अगदीं अपरिहार्य होतं, अशी माझी खात्री झाली आहे.

**१ शास्त्री.** सदर प्रश्न ब्रह्मवृंदाकडून माघारा घेतला जात आहे.

**सुब्रह्मण्य.** आतां मुख्य प्रश्न. अर्जदार डेव्हिड जोशी, तुम्हीं आपलं म्हणणं काय आहे, तें ब्रह्मवृंदापुढं मांडा.

**डेव्हिड.** माझ्या अर्जांत सर्व प्रमाणं आलींच आहेत. मुख्य प्रश्न आचाराचा असतो. माझे आचार कसे आहेत, हें खुद्द संस्थानदेवतेलाच माहित आहे.

**श्री,** अर्जदाराचे आणि त्याच्या वडिलांचे आचारविचार ब्राह्मणाला अनुरूप असेच असल्याचं मीं प्रत्यक्ष पाहिलं आहे. गुरुवर्य बिंदुमाधव-जीही या गोष्टीला साक्षी आहेत.

**पुट्टू.** याखेरीज दुसरे कुणीच साक्षीदार नाहींत काय ?

**बिंदुमाधव.** अशा परिस्थितींत दुसरे साक्षी विचारणं म्हणजे गादीचा उपमर्द आहे.

**शास्त्री.** याबद्दल सर्वाधिकारी यांचं काय म्हणणं आहे ?

**सुब्रह्मण्य.** सर्व ब्रह्मवृंदाला विरोध करण्याची माझी इच्छा नाहीं. श्रुतिस्मृतींचीं प्रमाणं मिळत असलीं तर ब्रह्मवृंदालाही हा अर्ज मान्य करणं भाग आहे.

**पुट्टू.** प्रस्तुत गोष्टीला श्रुतिस्मृतींत आधार नसल्याची आमची खात्री आहे.

**बिंदुमाधव.** तसं असणं अगदींच अशक्य नाहीं. कारण ज्या कालांत स्मृती झाल्या होत्या, त्या कालांत धर्मभेद फारसे अस्तित्वांत नव्हते. भारत-वर्षाचे राजेही सनातन आर्यधर्मीयच होते. राजाचा धर्म भिन्न असला तरच सामान्यजनांची धर्मांतराकडे प्रवृत्ति होते. ज्या वेळीं सर्व ज्ञात जगावर सनातन आर्यधर्माचंच साम्राज्य पसरलं होतं, त्या वेळीं धर्मांतर होण्याची शंका उत्पन्न होणंसुद्धां शक्य नव्हतं. आणि जिथं धर्मांतरच संभवत नव्हतं, तिथं परावर्तनाच्या उल्लेखाची तरी स्मृतीला काय जरूरी होती ?

**पुट्टू.** पण आमच्या धर्मांत सर्व कांहीं आहे. विमानें आहेत, आग-गाड्या आहेत, तारायंत्रें आहेत, तोफा आहेत, जंतु शास्त्र आहे. मग परावर्तनाचाच तेवढा आधार कां नसेल ? ज्या अर्थी एवढ्या सर्व गोष्टी वेदांत सांपडतात, त्या अर्थी परावर्तनाला कुठं आधार असता तर तो त्यांत मिळालाच पाहिजे, असं अखिल ब्रह्मवृंदाचं मत आहे.

**सुब्रह्मण्य.** हें मत सर्वांशीं ग्राह्य होईल, असं मुळींच म्हणतां येणार नाहीं; पण आर्यधर्मीयांत संकर न होऊं देण्याची शास्त्रांत सर्वत्र खबरदारी घेतली गेली आहे, हें ध्यानांत ठेवलं पाहिजे.

**बिंदुमाधव.** प्रायश्चित्त घेतल्यावर संकराचा प्रश्नच राहत नाहीं.

**शास्त्री.** पण प्रायश्चित्ताला तरी शास्त्राधार पाहिजेना ? शास्त्राधाराशिवाय कोणतीही गोष्ट करणं म्हणजे अधर्म आहे.

**बिंदुमाधव.** याला योग्य असा शास्त्राधार मलाच सांगतां येईल.

**शास्त्री** अब्रह्मण्यं—अब्रह्मण्यं ! स्वत: गुरुजीच अधर्माला पाठीशीं घालूं लागले. पुरा कलि आला. हा सारा कलियुगाचा प्रभाव !

**सुब्रह्मण्य.** याला आधार असल्यास गुरुजींनीं ते ब्रह्मवृंदापुढें मांडावेत, अशी संस्थानदेवतेची आज्ञा आहे.

**बिंदुमाधव.** महाराष्ट्रधर्मसंस्थापक छत्रपती श्रीशिवाजीमहाराज तुम्हांला माहित आहेत ना ?

**शास्त्री.** हें काय विचारावं ? श्रीशिवरायाला जाणत नाहीं, असा एकही हिंदु या भारतवर्षांत सांपडणार नाहीं.

**बिंदुमाधव.** त्याच श्रीशिवछत्रपतींनीं नेताजी पालकर नांवाच्या मुसलमानी धर्म स्वीकारलेल्या एका सरदाराला पुनः हिंदुधर्मांत घेतलं होतं.

**पुट्टू.** अतिशूद्र म्हणून असेल कदाचित !

**बिंदु.** मुळींच नाहीं. नेताजी पालकर परावर्तनानं क्षत्रियच झाला. दुसराही एक आधार आहे. मुसलमान झालेला बजाजी निंबाळकर जेव्हां पुनः क्षत्रिय करून घेतला गेला, त्यावेळीं छत्रपती श्रीशिवाजीमहाराजांनीं खुद्द आपली मुलगी त्याच्या मुलाला देऊन, त्याच्याशीं व्याह्याचं नातं जोडलं. बजाजीचं परावर्तन सर्वत्र ग्राह्य होण्यासाठीं त्या अवतारी पुरुषानं घालून दिलेला हा धडा प्रत्येक हिंदुमात्राला अनुकरणीय आहे.

**सुब्रह्मण्य.** छत्रपती शिवाजी म्हणजे कांहीं धर्मगुरु नव्हत.

**श्री.** खबरदार. जे श्रीशंकराचार्य तेच श्रीशिवाजी महाराज. आचार्यांनां जशी धर्मसंस्थापक ही पदवी मिळाली होती तशीच ती शिवरायांनींही मिळविली होती. साऱ्या भरतखंडांत गोब्राह्मणप्रतिपालक म्हणून ज्याच्या नांवाचा डंका दणाणत आहे, त्या शंकरावताराला तुम्ही धर्मगुरू नव्हे म्हणतां काय ? श्रीगोविंदपूज्यपादाचार्यांसारख्या श्रीसमर्थ

रामदासस्वामींनीं ज्या विभूतीला श्रीशंकराचार्यांप्रमाणंच आपल्या अनुग्रहानं अलंकृत केलं, गागाभट्टपंडितासारख्या सार्वभौम विद्वानानं ज्यांना राज्याभिषेक केला, श्रीशंकराचार्यांप्रमाणंच ज्यांनीं दिग्विजय करण्यासाठीं सनातन आर्यधर्माच्या ध्वजेवर संन्याशाच्या लंगोटीचा भगवा झेंडा फडकाविला, त्या श्रीशिवरायाची स्मृति हीच आमची स्मृति, त्याचं गुणश्रवण हींच आमची श्रुति, त्याचा इतिहास हींच आमचीं पुराणं आणि त्याची प्रत्येक कृति हेंच आमचं मानवधर्मशास्त्र. एवढ्याच आधारावर डेव्हिड जोशी याचं परावर्तन झालं पाहिजे. यापेक्षां दुसरा कोणताही शास्त्राधार देण्याची आमची इच्छा नाहीं.

**सुब्रह्मण्य.** पण शिवरायाच्या या कृतीनंतर पुढं अशीं परावर्तनं झालीं का?

**डेव्हिड.** होय. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत अशीं परावर्तनं झाली आहेत. छत्रपती राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत बाजी-प्रभु देशपांडे नांवाच्या एका हिंदू सरदाराचा मुलगा हबशी शामलानीं बाटविला होता, त्याला पुनः हिंदुधर्मांत घेण्यांत आलं होतं. पेशवाईच्या अखेरीच्या सुमारास असंच एक अतोणेकर नांवाचं हिंदुघराणं पावन करून घेतलं होतं, त्यांचे वंशज अजून महाराष्ट्रांत नांदत आहेत.

**पुट्टू.** अखिल ब्रह्मवृंदाला श्रुतिस्मृतीच्या आधाराखेरीज दुसरे कोणतेही आधार मान्य नाहींत, हें सर्वाधिकारी यांनीं ध्यानीं घ्यावें.

**शास्त्री.** या मताला अखिल ब्रह्मवृंदाच्यातर्फे मी दुजोरा देतों. हा दुजोरा ध्यानांत घेऊन सर्वाधिकारी यांनीं परंपरेला हाणून पाडूं देऊं नये, अशी अखिलब्रह्मवृंदाची आज्ञा आहे.

**सुब्रह्मण्य.** ब्रह्मवृंदाची आज्ञा मला प्रमाण आहे. इतिहासाचे आधार म्हणजे कांहीं शास्त्राधार नव्हत. आधीं परंपरा पाहिली पाहिजे. आजपर्यंत एकाही आचार्यांनीं खिस्त्यांना पावन करून घेतल्याचा आधार दसरीं सांपडत नाहीं. जें यापूर्वी घडून आलं नाहीं, तें आतांच कां घडावं? अशा क्षुल्लक गोष्टीसाठीं धर्मशास्त्रं कां तुडवावीं? जे बाटले आहेत किंवा बाटले-ल्यांच्या संकरांत जन्मले आहेत, त्यांची आम्हांला सहानुभूति वाटत नाहीं.

संख्याबल नाहींसं झालं तरी बेहेत्तर. पण परंपरा केव्हांही बिघडतां कामा नये. सारं हिंदुस्थान बाटून खिस्ती झालं तरी पत्करेल पण नुसत्या इतिहासाच्या आधारावर परंपरेवर कुठाराघात करणं अत्यंत लाजिरवाणं आहे. परंपरा निर्मळ ठेवणं हेंच आमचं ब्रीदवाक्य आहे. आणि त्याच्या समर्थनासाठीं आम्हीं आमचे प्राणसुद्धां खर्ची घालूं. या परंपरेला विरोध करण्याइतकं पुरुषार्थाचं प्राबल्य असणारी व्यक्ति-( किशोरी व दुलारी येतात. )

**किशोरी.** मी आहें. स्वामीजी, मला क्षमा करा. एवढ्या महत्त्वाच्या कार्यांत आपण एवढा मोठा ब्रह्मवृंद एकत्रित केला; पण आम्हां ब्राम्हणींची आपण मुळींच आठवण केली नाहीं. हें आमचं घरचं कार्य आहे. घरच्या कार्यांसाठीं ब्राह्मणांच्या स्त्रिया आमंत्रणाची वाट पहात नसतात. शिवाय आतां तुम्हीं नको म्हटलंत तरी आम्हीं स्त्रिया प्रत्येक कार्यांत हात घालणारच हें पक्कं समजा.

**पुट्टू.** अब्रह्मण्यं–अब्रह्मण्यं ! धर्मसभेंत स्त्रिया ? अब्रह्मण्यं !

**शास्त्री.** कलीचा प्रभाव–सारा कलीचा प्रभाव !

**किशोरी.** अहो सर्वाधिकारी, हे पुट्टूपंडित कोण आहेत ?

**सुब्रह्मण्य.** हे येथील ग्रामोपाध्ये असून एक विद्वान् दशग्रंथी ब्राह्मण आहेत.

**किशोरी.** मी म्हणतें, हे चांडाळ आहेत–पतित आहेंत ! पतिताहूनही अधम आहेत.

**पुट्टू.** हां हां पोरी, तोंड सांभाळून बोल.

**किशोरी.** हे खिस्त्याकडे चहा घेतात. अभक्ष्यभक्षण करतात. अपेयपान करतात. या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्याबद्दल आणि यांनीं आपल्या तोंडानं कबुली दिल्याबद्दल साक्षीदार ही दुलारी.

**पुट्टू.** कुभांड–कुभांड, निव्वळ कुभांड !

**किशोरी.** हे असले दुतोंडे तुमच्या हिंदूसमाजांत पत्करतात. उच्चवर्णांत जन्म घेऊन खाण्यापीण्याचा विधिनिषेध न बाळगणारे हजारों लोक

तुमच्या पंक्तीला खुशाल जेवतात. त्यांच्याशीं रोटीव्यवहार केल्यानं तुमची जात बुडत नाहीं. तुमच्या मुली त्यांच्या सुना झाल्यानं माहेराला मुकत नाहींत. त्यांच्या मुली अभक्ष्यभक्षणापासून उत्पन्न झालेल्या त्यांच्या मुली तुमच्या कुटुंबाचा विस्तार वाढवीत असल्या तरी तुम्हीं बेदिल होत नाहीं; आणि नुसतं खिती कुंडांतलं पाणी डोकीवर पडल्यामुळं सोज्वळ माणसालादेखील तुम्हीं पतित ठरवतां ? धिक्कार असो तुम्हांला ! सोडावॉटरच्या प्रत्येक घोटानं तुम्हीं बाटलां अहांत; डॉक्टरच्या औषधाच्या प्रत्येक भागानं तुम्हीं बाटलां आहांत; विधर्मी पानगृहांतील चहाच्या वादळांत तुमच्या जातीच्या फुटक्या तारवाचे प्रत्यहीं तुकडे उडत आहेत ! प्रायश्चित्ताच्या कैचींत पकडलं तर तुम्हां हिंदूंचे राई राई एवढाले तुकडे होतील ! लाखों लोकांनां प्रायश्चित्त देण्यासाठीं समुद्र आटवून त्याचं यज्ञकुंड बनवावं लागेल ! पण हें सारं तुम्हांला पत्करतं ! असल्या बाट्यांना बहिष्कार घालण्याचा ठराव कधींच पुढं येत नाहीं. झालं—आतां तो काळ गेला. आतां या असल्या बाडग्या सोंवळ्यांना बहिष्कार तरि घाला, किंवा डेव्हिडरावांसारख्या सोज्वळ विधर्मीयांना पावन तरी करून घ्या ! असं न कराल तर ही किशोरी जगाच्या चव्हाट्यावर उभी राहून ओरडणार कीं, धिक्कार—धिक्कार—धिक्कार असो या हिंदूलोकांच्या परंपरेला !

**दुलारी.** ऐका—ऐका.

**पुट्टू.** ( सुब्रह्मण्याला एकीकडे ) अगदीं डगमगूं नका. या वेळीं जोर धरा आणि परंपरेचं नांव राखा. आम्हीं नवा मुकुट करून तुमच्या मस्तकावर चढवूं. बस्स, एकदम अर्ज नामंजूर करा.

**सुब्रह्मण्य.** संस्थानदेवता डेव्हिड गंगाधर जोशी याचा परावर्तनाचा अर्ज नामंजूर करीत आहे.

**श्री.** मी हा अर्ज मंजूर करतों.

**सुब्रह्मण्य.** केव्हांही नाहीं. एक वेळ ऐकलं तें पुरे झालं. संस्थान-देवता निष्कारण मुकुटाला मुकली. परंपरेच्या स्थायित्वासाठीं यापुढं मी सर्व सूत्रं माझ्याच हातीं घेणार. हा अर्ज नामंजूर आहे.

**श्री.** सुब्रह्मण्य, मी कोण आहें ? तुमचा आचार्य कीं तुमचा गुलाम ?

**सुब्रह्मण्य.** परंपरेच्यां विरुद्ध जाईल तो मुळीं आचार्यच नव्हे.

**श्री.** मी तुमचा आचार्य नव्हे ? ( त्रिवार विचारतो ) बरोबर आहे. मी तुमचा आचार्य नाहीं. समाधिस्थ श्रींचा मी आचार्य होतों. त्यांनीं कदाचित् माझं म्हणणं ऐकलं असतं, कारण त्यांनीं मला गादीवर बसवलं होतं. मी तुमचा असतों तर तुम्हीं माझ्या शब्दाला मान दिला असता. बौद्धांना पादाक्रांत करणाराला तुम्हीं नाकारलं नसतं; मंडनमिश्राचं कर्मकांड मोडून त्याला संन्यास देणाराला तुम्हीं नाकारलं नसतं; हिमालयापासून कन्याकुमारींपर्यंत सारं भारतवर्ष थरारून सोडणाऱ्या शंकराचा धिक्कार करण्याची तुमची काय छाती होती ! हें सिंहासन त्या शंकराचार्यांना लोकांनीं दिलं होतं; पण मी मात्र वाडवडिलांनीं कष्टानं मिळविलेल्या वैभवाचा बेदरकार उपभोग घेणाऱ्या कर्तृत्वशून्य उधळ्या मुलासारखा नुसता चैनीचा मालक होऊन बसलों आहें. लोकसेवेच्या तपोबलानं ज्यानं हें सिंहासन मिळविलं नाहीं, त्याला दुसऱ्याला उपदेश करण्याचा अधिकारच नाहीं. शारदांबेच्या शंकराची कर्तृत्वशक्ती ज्याच्या अंगीं नाहीं त्यानं या गादीवर बसणं म्हणजे जगद्गुरुत्वाचीं भयंकर विटंबनाच होय. हा दोष तुमचा नाहीं. अजूनपर्यंत तुम्हीं आपला आचार्य निवडण्याची सुरवात केली नाहीं. शंकराचार्य लोकनियुक्त असल्याशिवाय त्याच्या मताला केव्हांही मान मिळणार नाहीं. आतां तुमचा आचार्य तुम्हींच निवडून घ्या. शंकराचार्यांच्या मिरवणुकींपुढल्या हत्तीसारखा मी या लोकसमाजापुढला शोभेचा हत्ती होऊन राहूं इच्छित नाहीं—

पद ( चाल—तुवा पिया प्यारे. )

**पुरा वीट आला । न थारा विचारा । अधिकार हा**
**थोर तुम्हि घ्या परतला ॥ ध्रु० ॥ मज लोकसेवा ॥ वाटे**
**विसांवा । भिक्षान्नजीवी पहा हा निघाला ॥ १ ॥** ( जातो ).

पडदा पडतो.

**अंक दुसरा समाप्त.**

---



सुब्रह्मण्य—हा काय चमत्कार? पान १०२



श्री—पुरा वीट आला ॥ पान ८०

The Manoranjan Press, Bombay.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

### स्थळ—रस्ता.

( पुट्टू पंडित व सुब्रह्मण्यशास्त्री )

**सुब्रह्मण्य.** बस्स करा तुमची बडबड. माझा निश्चय झाला तो झाला. असा हरघडी मतं बदलणारा मनुष्य मी नव्हे, हें पक्कं ध्यानांत ठेवा.

**पुट्टू.** मर्जी तुमची. सहा महिन्यापूर्वी त्या सभेच्या वेळेला तुह्मांला मी सांगितलं होतं, तेंच अझून सांगतों. नवा मुकुट करवतों, नवा मठ उभारतों, सारं नवं संस्थान तयार करवितों. नुसते तुह्मीं संन्यासाला तयार व्हा.

**सुब्रह्मण्य.** श्रींची स्वारी इतक्यांत येऊनसुद्धां पोहोंचेल;आणि आतां मी संन्यास घेऊं ? नाहीं—पुट्टू पंडित, माझा निश्चय आतां कालत्रयीं बदलणार नाहीं. त्या वेळीं मी तुमच्या पक्षाची तरफदारी केली ती मुकुटाच्या आशेनं केली नाहीं. आजपर्यंत ज्या पक्षाचा अभिमान धरला होता त्याची बाजू आयत्यावेळीं पडलेली पाहून मला नुसती ईर्षा उत्पन्न झाली. ह्मणूनच त्यावेळीं मी श्रींना विरुद्ध गेलों होतों; पण आतां तो मनू पालटला.

**पुट्टू.** कसला मनू पालटला ? तुमचं मला आश्चर्य वाटतं. बिंदु माधवजी व्याख्यानं देऊं लागले तर तुम्हींही निघालांत त्यांच्या बरोबर ! त्या दोघी पोरी—त्या देखील व्याख्यानं देऊं लागल्या ! काय आश्चर्य आहे ? चार शब्द बोलतांना आमच्यासारख्यांचीही बोबडी वळते आणि या पोरी आतां व्याख्यानं देऊन श्रींच्या बाजूनं मतं गोळा करूं लागल्या. पुरा कलि आला खरा ! त्या पूरांत आणि त्यानंतरच्या ओल्या दुष्काळांत मठ विकून शूद्रांच्या नांगरणीला पैसे चारलेले—मग मतं मिळायला काय तोटा ? एवढा पैशाचा व्यय झाला पण आमच्यासारख्या सत्पात्रांना दाक्षिणेदाखल एक पैसुद्धां दिली नाहीं. कशाला हे उपद्व्याप ? आजपर्यंत मिशनरी लोकच ना करित होते हीं कामं ! आतां तुम्हीं त्यांत हात घालून काय मिळवलंत ?

**सुब्रह्मण्य.** काय मिळवलं ! पुट्टूपंडित, आमचा आपलेपणा आम्हीं मिळवला. आमच्या लोकांना आतां आमचे आम्हीच मदत करूं लागलों. काय मिळवलं ! आमचे आचार्य आम्हीं पुनः मिळवले. समजलं. तुमच्या अभिषानं आतां माझ्या तोंडाला मुळींच पाणी सुटणार नाहीं. माझी आवड मला कळली. संसारांत मला जें सौख्य वाटतं तें संन्यासांत मुळींच वाटत नाहीं. आतां कुणीही शंकराचार्य झाला तरी मला त्याची पर्वा नाहीं. शंकराप्रमाणं माझी गंगा मस्तकीं धारण करून मी आतां खुशाल संसार थाटून राहीन. तेंच माझं शंकराचार्यत्व.

**पुट्टू.** पण आतां परंपरेचं काय ?

**सुब्रह्मण्य.** परंपरेसाठींच मी संसार थाटणार. माझे वाडवडील असे भरतारुण्यांत संन्यास घेते तर मीही तो घेतला असता. पण मग माझंच अस्तित्व कुठलं असणार होतं ! माझ्या वाडवडिलांची परपरा चालविण्या-साठींच मला संसारी बनलं पाहिजे.

**पुट्टू.** तर मग आतां साराच अवतार आटोपला म्हणायचा. आतां त्यागराज पुनः गादीवर बसतील आणि मनसोक्त वागूं लागतील. आणि मग आम्हां लोकांचं कांहींच चालणार नाहीं.

**सुब्रह्मण्य.** आजपर्यंत तुम्हीं मनसोक्त वागत आलांत, आतां त्याग-राज वागतील. त्यांत कुठं बिघडलं ?

**पुट्टू.** कुठं बिघडलं ? अहा - परंपरा बुडाली, परंपरा बुडाली. तेच खिस्ती पहा, परंपरा केव्हांही सोडित नाहींत. एवढी थट्टा होते पण बायबलची भाषासुद्धां शुद्ध करीत नाहींत. धर्मग्रंथाचा अर्थ कळला तर पुरुषार्थ तो काय राहिला ! धर्माच्या बाबतींत अशी चिकाटी पाहिजे. आणि तुम्हीं तर सारे इंग्रजी लोक जमवून हें नवंच एक धर्ममंडळ बनवीत आहांत. आतां आम्हां पुराण्या लोकांचं काय होणार ?

**सुब्रह्मण्य.** आतां पुराण्यांचं पुराण बस्स झालं. ती पहा श्रींचीच स्वारी आली. चला. ( जातात )

---

## प्रवेश दुसरा.

### स्थळ— बिंदुमाधवांचें घर.

( डेव्हिड )

डेव्हिड. एकवेळ पूर्णपणें मावळलेली आशा पुनः जागी झाली. आज इतक्यांतच त्यागराजाची पुनः गादीवर स्थापना झाली असेल. तो समारंभ पाहण्यासाठीं जावं असं मला किती वाटत होतं ! पण गुरूजीनींच प्रतिकार केल्यामुळं माझा नाइलाज झाला. याच प्रसंगाला परावर्तनाची पुनः विनंती करावी असं मला कितीकदां वाटलं ! पण उतावीळपणा करून तरी काय उपयोग ? आशेचा थोडासा अंकुर सुद्धां मनाला किती प्रफुल्लित करतो बरं ! तोच मी त्यागराजाच्या शोधासाठीं हिमालयांत भटकत असतांना माझी केवढी निराशा झाली होती ! मन किती स्वार्थी असतं हें ! हिंदुसमाजाचं कल्याण त्या वेळीं मला आठवलं नव्हतं, बिंदुमाधव गुरूजींचा मनस्ताप मला दिसत नव्हता, सुब्रह्मण्यांचा अकालिक पश्चात्ताप माझ्या मनावर कांहींच परिणाम करीत नव्हता. फक्त माझ्या स्वतःच्या आशेच्या निराशेमुळंच मी हिमालयावर धाव ठोकली. किती रमणीय स्थान तें ! नुसत्या तिथल्या वायूच्या स्पर्शानंच मी पावन झालोंसं मला वाटलं. माझं प्रायश्चित्त हिमालयाच्या एका दर्शनानंच पूर्णतेला गेलं. हिमालयानंच मला माझ्या सह्याद्रीची आठवण करून दिली. हिमालयाचीं शिखरं त्यागराजाच्या कृपेनं मला दिसलीं पण माझ्या सह्याद्रीच्या पायथा मला कुणाच्या पुण्याईनं दिसणार ? माझ्या कोकणचं मी बाबांच्या तोंडून नुसतं वर्णन ऐकलं होतं. अहाहा ! हिमालयावरच्या देवदारू वृक्षाप्रमाणेंच नारळी पोफळी कोकणाला शोभवीत असतील ! हिमालयावरच्या हिमतुषारांप्रमाणं तुफान समुद्राचा फुरफुरणारा फेस माझ्या कोकणभूमीचं पादप्रक्षालन करीत असेल ! या जन्मीं तें दृश्य मला दिसेल का ? अरेरे !

पद ( चाल—मर्ग जय्ये हो. )

मग सह्यें त्या । या हतभवा कां त्यजावें ॥ धृ० ॥
पायिं जयाचिया । राहुनियां असावें ॥ १ ॥
सागरसंगमा । पाहुनियां नमावें ॥ २ ॥

**सुब्रह्मण्य.** ( प्रवेश करून ) कोण ? डेव्हिड ? तुम्हीं आज मठांत कां आलां नाहींत ?

**डेव्हिड.** तुमचेच का हे उद्गार ? मी स्वप्नांत तर नाहीं ना ?

**सुब्रह्मण्य.** मुळींच नाहीं. अहो डेव्हिड, आचार्यांच्या गादीच्या पुनरुद्धाराचं बरंचसं श्रेय तुम्हींच मिळवलं आहे. तुमच्या श्रेयाचा वाटा तुम्हांला न दिला तर आम्हीं कृतघ्न नाहीं का ठरणार ? तुम्हीं नसतां तर आचार्य आज आम्हांला पुनः लाभलेच नसते.

**डेव्हिड.** पण या आचार्यांच्या मागं तुम्हींच गादीवर बसाल असा पुष्कळांचा समज होता.

**सुब्रह्मण्य** कदाचित् तसं झालंही असतं; पण मीं पोक्त विचार केला. कुटुंबवत्सल होऊन सुखाचा संसार थाटण्यापेक्षां संन्याशाचा संसार मला तितकासा आकर्षक वाटला नाहीं. झालं तें बरंच झालं. माझ्या एकट्यावरच आतां सर्व कामाचा तितकासा बोजाही पडणार नाहीं; कारण नवीन नेमलेल्या धर्ममंडळाकडेसच आतां सर्व कामं सोंपविलीं आहेत. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, या धर्ममंडळानंच मला आपला सर्वाधिकारी निवडून दिला आहे. किती अभिमानाची गोष्ट आहे ही !

**डेव्हिड.** ( स्वगत ) हें त्यागराजाचं खासगी वजन तर धर्ममंडळावर पडलं नाहीं ना ?

**सुब्रह्मण्य.** आतां तुम्हांलाही थोडीशी आशा बाळगायला हरकत नाहीं. धर्ममंडळाच्या बऱ्याच सभासदांची मतं मी अजमावून पाहिलीं, तीं बहुतेक तुम्हांला अनुकूलच पडतील असं मला वाटलं.

**डेव्हिड.** खरंच ना ? तर मग आतां माझा अर्ज मी केव्हां सादर करूं ?

**सुब्रह्मण्य.** तें आतां हळुहळु ठरवितां येईल. पण ही किशोरी फार अद्वितीय मुलगी आहे असं तुम्हांला नाहीं का वाटत ?

**डेव्हिड.** किशोरी खरोखरच एक अद्वितीय स्त्री आहे. मोठमोठ्या पुरुषांना जें कार्य करतां आलं नाहीं, तें या एका स्त्रीनं प्रत्यक्ष करून

दाखविलं. केवढा मनाचा निधडेपणा तो ! मला वाटतं आचार्यांच्या गादीच्या पुनर्घटनेची तिनं जर खटपट केली नसती तर ही गादी आणखी कांहीं वर्षे मुळींच मोकळी राहिली असती. आचार्यांनीं गादी सोडल्यावर कुणी शंकराचार्य म्हणून होते याचीही कुणाला आठवण राहिली नाहीं. विरोधाला मात्र सारे तयार; पण प्रतिरोधाला कुणीच पुढं आला नाहीं. आचार्यांच्या गादीची अशीच अवस्था होत गेली, तर थोड्या दिवसांत मला वाटतं, या गाद्याच नाहींशा होतील. आणि नुसत्या मनाच्या बळावर हें संकट टाळलं कुणी ? तर एका हिंदु स्त्रीनं ! धन्य धन्य या हिंदु स्त्रिया !

**सुब्रह्मण्य.** झालं खरं, आतां काय बोलणार ? दुलारीनं माझे डोळे उघडले नसते तर मी देखील या ब्रह्मवृंदाच्या लांचाला बळी पडलों असतों. स्त्रीशिवाय पुरुष अपूर्ण खरा ! वाःरे दुलारी ! डेव्हिड, तुम्हांला दुलारीबद्दल काय वाटतं ?

**डेव्हिड.** तुमची पत्नी व्हायला ती पूणपणें पात्र आहे.

**सुब्रह्मण्य.** छेः छेः, हें वर्णन अगदींच अपुरं वाटतं. दुलारीचं वर्णन करण्यासाठीं सर्व महाकवींच्या काव्यांचं अध्ययन करावं लागेल; दुलारीचं वर्णन करण्यासाठीं जगांतील सर्व कोशांतले सुंदर सुंदर शब्द बेधडक चोरावे लागतील; दुलारीचं वर्णन करण्यासाठीं शेषाच्या साऱ्या जिव्हा उसन्या आणाव्या लागतील; दुलारीचं चिंतन करण्याठीं महायोग्यांच्या समाधिसुखावर दरोडा घालावा लागेल; दुलारीचं रूप पाहण्यासाठीं इंद्राचे डोळे मागावे लागतील; दुलारीचं चुंबन—

**डेव्हिड.** काय बोलतां हें !

**सुब्रह्मण्य.** दुलारी म्हटली कीं माझी लाज नाहींशी होते. खरोखर डेव्हिड, तिचं चुंबन घेण्यासाठीं विराटपुरुषाचीं असंख्य मुखं धडावर चिकटवावीं लागतील; तिचं आलिंगन घेण्यासाठीं सहस्रार्जुन बनावं लागेल. एकाच शब्दांत सांगायचं म्हणजे दुलारीसाठीं—मुकुटाच्या असो किंवा बिन मुकुटाच्या असो—आचार्यपदावर लाथ मारून तिची लाथ मिळण्यासाठीं तिचा दासच व्हावं लागेल.

**डेव्हिड.** कुणाही रमणीचं वर्णन तिच्या वल्लभालाच चांगलं साधतं खरं.

**सुब्रह्मण्य.** वेडा बिचारा त्यागराज ! लोकसेवेसाठीं संन्यासच कशाला पाहिजे ? सुखाचा संसार याटून त्याला लोकसेवाही करतां आली असती.
( बिंदुमाधव व किशोरी येतात. )

**बिंदुमाधव.** सुखाचा संसार करून लोकसेवा होणं महाकठिण आहे. सुब्रह्मण्य, संसार करून पाहिल्यानंतरच मग सुखाची आणि संसाराची सांगड घाला.

**सुब्रह्मण्य.** तुम्हीं आतांच याल, हें माझ्या ध्यानांत असतं तर मी मुळींच असं बोललों नसतों. तरी बरंच, तारुण्याशिवाय कुणालाही वार्धक्य येत नाहीं.

**बिंदुमाधव.** मी तरुण होतों, हें माझ्या ध्यानांत आहे, आणि म्हणूनच तरुणांना वेळोवेळीं सावध करावं, असं मला वाटत असतं. सावध असल्याशिवाय 'सावधान' झालं, तर कुणालाही केव्हांही पश्चात्तापच होत असतो.

**सुब्रह्मण्य.** केव्हांही मी सावधच असतों. हंसतेस काय किशोरी ? मी सुरवातीला बहुतेक घसरतों; पण पुढं वेळींच सावध होतों. दुलारीला विचारून पहा. तीही असंच सांगेल.

**किशोरी.** असंच सांगणार. सावध करणारी तरी तीच ना ? पण सुब्रह्मण्य, दुलारीविषयीं एवढा आदर तुम्हीं न दाखवावा हेंच बरं.

**डेव्हिड.** कुणाच्याही मनावर कुणीही सत्ता गाजवूं नये. पार-तंत्र्याच्या बुजबुजाटाच्या या काळांत एकटं मनच काय तें स्वतंत्र राहूं शकतं. त्याला पायबंद कां घालावा ?

**बिंदुमाधव.** मनाला पायबंद घालावा असं कुणीही म्हणूं नये. फक्त बुद्धीच्या ताब्यांत मन द्यावं, बुद्धी मात्र केव्हांही मनाच्या ताब्यांत देऊं नये. पण आनंदाच्या वेळीं हे वितंडवाद कशाला ? डेव्हिड, त्यागराजांनीं आज शेवटीं आचार्यपद स्वीकारलं नाहींच तें तुला कळलं ना ?

**डेव्हिड.** म्हणजे ? सुब्रह्मण्य, तुम्हीं आधींच मला हें कां नाहीं सांगितलं ? अरेरे ! निराशा अजूनही माझी पाठ सोडीत नाहीं ना ?

**सुब्रह्मण्य.** असे हताश होऊं नका. तुमच्या आशेला अझून बरीच जागा आहे. आचार्यांची गादी जरी आतां मोकळीच राहिली आहे—

**डेव्हिड.** पुनः त्यागराज निघून गेले का ? सांगा-सांगा, ते कुठं गेले तें आधीं मला सांगा. सात समुद्र ओलांडून देखील मी त्यांना पुनः शोधून घेऊन येईन.

**किशोरी.** ते इथंच आहेत. कुठं गेलेही नाहींत; आणि आतां कुठं जाणारही नाहींत. आचार्यांच्या गादीचा जरी त्यांनीं स्वीकार केला नाहीं, तरीही ते प्रतिनिधी ह्मणून राहिले आहेत. यापुढं आचार्यांच्या गादीवर फक्त आचार्यांच्या पादुकाच राहतील.

**बिंदुमाधव.** ऐकलंस ना डेव्हिड ? एवढ्यामुळंच मला त्यागराजाचा अभिमान वाटतो. एकदां गादी सोडली ती सोडली, पुनः ह्मणून तिला त्यानं पाय लावला नाहीं.

**डेव्हिड.** याच त्याच्या बाणेदारपणाच्या खात्रीमुळं मी माझी आशा जिवंत ठेवित आलों. नाहींतर आशा बाळगायला मला अझून दुसऱ्या कुठंही आधार मिळाला नाहीं.

पद—( चाल—शकुन होइ सुंदर )

पिशुनलोक चंचल चमला । छल अपार जरि केला ॥
मजला सतत विषादपरा । प्रबल बंधु सजला तो ॥ १ ॥
सलिलजालिं चुकल्या मनुजा । ध्रुव नभांत पथराजा ॥
जगिं या अढळ मला गमला । प्रबल बंधु सजला तो ॥ २ ॥

**सुब्रह्मण्य.** आतां तुम्हीं निर्धास्त रहा. आजपर्यंत तुमचा सर्वांत मोठा शत्रू मी होतों, पण आतां माझ्यापासून काडीचेंही भय बाळगण्याचं तुम्हांला कारण नाहीं. दुलारीच्या शिक्षणानं आतां माझीं पूर्वीची मतं बहुतेक बदलत चाललीं आहेत. यापुढं झाली तर माझ्याकडून तुम्हांला मदतच होईल.

**किशोरी.** लोकनियुक्त आचार्यांच्या हातीं सत्ता जातांच सर्वाधिकाऱ्यांचाही स्वर बदलूं लागला.

**सुब्रह्मण्य.** थट्टा करूं नकोस किशोरी. मी चिडलों तर डेव्हिडच्या तरफदारीसाठीं एकटाच साऱ्या जगाशीं भांडायला कमी करणार नाहीं.

**बिंदुमाधव.** चिडूनजाऊन केलेलीं कार्यं आरंभीं सफल झालीं, तरी परिणामीं मुळींच चिरस्थायी होत नसतात. कोणतीही गोष्ट विचारानंच झाली पाहिजे, मग तिचा परिणाम कचित् अप्रिय झाला तरी बेहत्तर!

**डेव्हिड.** सुब्रह्मण्य, माझ्या देहाला ब्राह्मणाप्रमाणं मंत्राग्नि मिळण्याची खात्री देत असाल तर या परावर्तनासाठीं मी देहांत प्रायश्चित्त सुद्धां घेईन. मग तरी तुमचं समाधान होईल ना?

**सुब्रह्मण्य.** ठीक आहे. अतिविचार करण्याचा मला अगदीं कंटाळा आहे. कोणतीही गोष्ट धूमधडाक्यानं करण्यांतच मला आनंद होतो. पहा, आतांच मी काय करतों तें पहा. दुलारी अजून आली नाहीं ना! हरकत नाहीं. तिला भेटण्यासाठीं मी मुद्दाम आलों होतों, पण आतां भेट राहुंदेच. देहांत प्रायश्चित्ताला देखील जो तयार आहे तो ब्राह्मण झालाच पाहिजे. आतां डेव्हिडच्या परावर्तनाचा ठराव कायम केल्याशिवाय पुनः तुम्हां कुणालाही भेटायचं नाहीं, हीच माझी प्रतिज्ञा. पाहूं आतां, विचार श्रेष्ठ कीं अविचार श्रेष्ठ! ( जातो. )

**डेव्हिड.** काय चमत्कार आहे! काल बदलतांच शत्रूचेही मित्र बनतात. पांचामुखीं परमेश्वर ह्मणतात, तें कांहीं खोटं नाहीं. लोकसत्तेच्या प्राबल्याबरोबर विरोध किती सहज वितळून गेला!

**किशोरी.** छीः, हा नुसता फेस आहे. नुसत्या सवंग लोकप्रियतेच्या आवडीमुळं चाललेली ही साधी संपादणी आहे. कां बाबा, तुम्हांला काय वाटतं?

**बिंदुमाधव.** मला कांहींही वाटलं तरी तें यावेळीं बाजूला ठेवलं पाहिजे. डेव्हिड ब्राह्मण व्हावा, एवढीच माझी इच्छा आहे; आणि ती अशा मार्गानं जर आज प्रत्यक्ष घडून येत असेल तर घटकाभर मी माझीं मतं आनंदानं बाजूला ठेवीन. सुब्रह्मण्य मनाचा चंचल असला तरी सहृदय आहे. योग्य मार्गानं कामीं लावून घेतलीं तर हीं असलीं माणसं देखील केव्हां केव्हां मोठमोठीं कार्यं घडवून आणतात.

**डेव्हिड.** पण उतावीळपणानं भलतंच कांहींतरी केल्यामुळं मूळच कोसळून पडणार नाहीं ना ?

**बिंदुमाधव.** त्याविषयीं मलाच सावध राहिलं पाहिजे. पण डेव्हिड, तुला पुनः सांगतों, आशा आणि निराशा दोन्हीही सारख्याच दुःसह असतात. प्रयत्न बलवत्तर करावेत; पण आशेला मात्र कुरवाळित बसूं नये. आशा म्हणजे एक माणसाळलेली वाघिण आहे. शक्य तेवढं तिच्यापासून दूरच राहवं. कारण ती केव्हां उलटेल याचा नियम नसतो. किशोरी, मला आतां पुनः मठांत गेलं पाहिजे, सुब्रह्मण्यावर मला चांगलीच नजर ठेवली पाहिजे. दुलारी आल्यावर तूंही मठांत ये. या कामीं तुझीही मदत कदाचित घ्यावी लागेल. ( जातो. )

**किशोरी.** दुलारी आज अझून कां आली नाहीं ? अशी अवेळीं ती केव्हांही सांगितल्याशिवाय घराबाहेर राहत नाहीं. काय असेल तें असो, आज इथं माझ्याच्यानं एकटं कांहीं राहवत नाहीं.

**डेव्हिड.** एकटं कां ? मी इथं आहेना ?

**किशोरी.** म्हणूनच मला अगदीं एकटं वाटतं. तुमच्या सदादुःखी मुद्रेमुळं तुमचं असणं जवळजवळ नसल्यासारखंच वाटूं लागतं.

**डेव्हिड.** अगदीं योग्य मीमांसा केलीत. माझं अस्तित्व नसण्यासारखंच झालं आहे. या जगांत मी असलों काय आणि नसलों काय दोन्हीं सारखींच आहेत. मी असल्यानं कुठंही पूर्णत्व येत नाहीं, आणि नसल्याची कुणालाही उणीव भासत नाहीं. माझं असं म्हणायला या जगांत कोण आहे ? माझ्या असण्यानं हसणारं कुणी नाहीं तसंच नसण्यानं रडणारंही कुणी नाहीं.

**किशोरी.** कां बरं ? त्यागराज आहेत ना ?

**डेव्हिड.** किशोरीदेवी, मी संसारी नसलों तरी संन्यासी नाहीं, हें तुम्हाला माहित आहे ना ? त्यागराजावर साऱ्या जगाची सत्ता आहे. माझ्या एकट्यासाठीं त्यानं सर्वस्व अर्पण करायला मी कांहीं विश्वाचं प्रतिबिंब नव्हे ! तो जगासाठीं आहे. जग कांहीं त्याच्यासाठीं खोळंबून राहणार नाहीं. त्यागराजवर सत्ता गाजविण्याचा कुणालाही अधिकार नाहीं.

**किशोरी.** ( स्वगत ) माझ्यापेक्षां यांनाच त्यागराजाला ओळखतां आलं तर ? हें कसल्या प्रेमाचं लक्षण ?

**डेव्हिड.** किशोरीदेवी, स्तब्ध कां राहिलांत ? माझं मत चुकलं का ?

**किशोरी.** तुमचं मत अगदीं बरोबर पडल्यामुळंच मला आश्चर्य वाटलं. पुरुषांची पारख स्त्रियांनाच चांगली होते असं कुणी म्हणतात, पण आज एका पुरुषाची पारख करण्यांत तुम्हीं स्त्रियांनाही लाजविलंत यांत कांहीं शंका नाहीं.

**डेव्हिड.** स्त्रियांना लाजविणं काहीं फारसं कठिण नसतं. लज्जा हा स्त्रियांचा अलंकार आहे. आणि त्याचं प्रदर्शन करण्यांत त्या फार कुशल असतात—

**( काफी—त्रिवट. )**

शशिकर हांसवि कुमुदसुमाला । प्रियकर हंसतां लाजति बाला ॥ धृ० ॥
लाजति रविकरीं कोमल कलिका । घनजल हंसवित सरिता वनिता ।
नरांसि न लाज हंसविल ॥ १ ॥

**किशोरी.** परावर्तनाच्या आशेनं आज तुम्हांला बराच उल्हास आल्यासारखा दिसतो.

**डेव्हिड.** मला उल्हास आला आहे असं जर तुम्हांला वाटत असेल, तर त्याचं कारण आशा खास नाहीं. माझ्या सदादुःखी मुद्रेनं तुम्हांला माझा सहवास कंटाळवाणा न वाटावा, एवढ्यासाठींच माझ्या दुःखसागराला आनंदाचं भरतं आणावं लागत आहे.

**किशोरी.** माझ्या जाचामुळं तरी तुम्हांला आनंदाची आठवण झाली हें मोठंच भाग्य म्हणायचं !

**डेव्हिड.** म्हणूनच तुम्हीं अझूनही माझा जाच वाढवित अहांत वाटतं ? किशोरीदेवी, तुमच्या जाचानं देखील मला आनंद होतो. कुणीच माझ्याकडे लक्ष्य देत नाहींत, मग तुम्हीं मला त्रास देण्यापुरती तरी माझ्याकडे नजर वळविलीत हें काय थोडं झालं ?

**किशोरी.** एवढ्यानंच जर तुम्हांला आनंद होत असेल तर तुम्हीं अगदींच अल्पसंतोषी ठराल.

**डेव्हिड.** छेः छेः मी फारच आधाशी आहें. पण माझी भीमसेनी क्षुधा निवारण करण्याचा प्रयत्न करणारी द्रौपदी आहे कुठं? माझ्या अरण्य-रुदनाचं सांत्वन करण्यासाठीं देवानं मला जिव्हाळ्याचं असं कुणीच शिल्लक ठेवलं नाहीं.

**किशोरी.** (स्वगत) गाणं मूळपदावर येऊं लागलं! (उघड) मिस्टर जोशी, परावर्तन झाल्यावर तुम्हीं पुढं काय करायचं ठरविलं आहे?

**डेव्हिड.** आधीं परावर्तन झाल्याशिवाय नंतर काय करायचं याचा विचार कशाला? किशोरीदेवी, इतक्या कळकळीनं तुम्हीं माझा सत्कार करीत असतांही माझ्या जिव्हाळ्याचं कुणीच नाहीं असं मी म्हटलं, त्याची मला क्षमा करा.

**किशोरी** एकूण तुम्हीं जिव्हाळ्याचा संबंध माझ्यापर्यंत आणून जोडला म्हणायचा!

**डेव्हिड.** एवढं माझं भाग्य कुठं आहे?

**किशोरी.** काय म्हटलंत?

**डेव्हिड.** दुर्दैवाच्या चापानं माझं तोंड बंद झालं आहे. तें उघडं असतं तर या हृदयांत सळसळणाऱ्या उज्ज्वल भावनांच्या प्रदर्शनानं मी तुम्हांला दिपवून टाकलं असतं. कडाडणाऱ्या विजेचं मला भय वाटलं नसतं तर चमकत्या नक्षत्रांच्या भुलावणीनं मी तुमच्या उघड्या डोळ्यांना झांपड आणली असती. अश्रूंच्या पावसाला मी भ्यालों नसतों तर ह्या हृदयांतील रक्ताच्या मुसळधार वर्षावानं मी तुमच्या कठोरतेला चिंब भिजवून टाकलं असतं. किशोरीदेवी, निराशेच्या प्रळयकाळाला तोंड देण्याइतकं चिरंजीव मार्कंडेयाचं धैर्य माझ्या अंगीं असतं, बारा योजनं जळतं रान गिळून टाकणाऱ्या कृष्णाइतका मी हिमहृदयी असतों, असंख्य योजनं समुद्र ओलांडणाऱ्या मारुतीसारखा मी एखादा बलभीम असतों तर एकाच शब्दानं—एकाच निःशब्द शब्दानं मी तुमची वाचा बंद करून टाकली असती; आणि मग या दुबळ्या दीनाला जिव्हाळ्याचं कोण आहे, याचा पुरावा प्रत्यक्ष पाहाण्यासाठीं तुम्हांला आपलं हृदय शोधायला लावलं असतं.

**किशोरी.** झालं तुमचं बरळणं ? कीं अजून काहीं राहिलं आहे ?

**डेव्हिड.** शब्दांचं भाषण संपवतां येईल; पण किशोरीदेवी, वाचे-पलिकडची देखील एक भाषा आहे. तिची सुनावणी केव्हांही थांबत नसते. तोंड बंद ठेवलं तरी त्या शब्दांचे विद्युत्तरंग सारखे चमकत राहतात; आणि बंद केलेल्या कानांतून ते न ऐकणाऱ्या हृदयालाही धक्का देतात.

**किशोरी.** आणि ऐकणाऱ्या हृदयाला ?

**डेव्हिड.** अहाहा ! ऐकणाऱ्या हृदयाला ! किशोरीदेवी, ऐकणाऱ्या हृदयाला काहींच सांगावं लागत नाहीं.

**किशोरी.** मिस्टर डेव्हिड—

**डेव्हिड.** ( स्वगत ) डेव्हिड !

**किशोरी.** मिस्टर जोशी, मला वाटतं, परावर्तनाच्या आशेच्या कैफानं तुमची नित्याची मुग्धवृत्ती आज बेफाम उसळली आहे. असला कैफी बेहोषपणा निशा उतरतांच कैफ्याला निःशक्त करतो, हें चांगलं ध्यानांत ठेवा.

**डेव्हिड.** ती भीतीच नको. माझा कैफ आशेचा नाहीं. हे निराशेच्या धुक्यावर बांधलेले, गगनाला गवसणी घालणारे, फुक्या फुंकरीचे भक्कम मनोरे आहेत. हे कोसळून पडण्याची मुळींच भीती नाहीं. जें मुळींच नाहीं तें नाहींसं कसं होईल ? आणि जें नश्वर नाहीं, जें नाहींसं होण्याची शंका नाहीं, त्याची आराधना मी कां करूं नये ?

**किशोरी.** चांगलाच सूड उगवलात म्हणायचा ! आरंभीं मी तुमच्या दुःखी मुद्रेच्या दीनवाण्या दर्शनाची शंका घेतली; पण आतां तुमच्या उल्हसित वृत्तीच्या दबकावणीचंच मला भय वाटूं लागलं आहे. दुलारी अजून कां येत नाहीं ?

**डेव्हिड.** एकाच शब्दानं त्यागराजासारख्या निधड्या वीराला जमिनदोस्त करून टाकणारी देवता, एका वेड्यापिशाच्या खुळ्या चाळ्यांनीं घाबरून कां जावी ? किशोरीदेवी, मी एक मेलेला जीव आहें. जिवंतपणाचं चैतन्य मी हरवून बसलों आहें. माझ्यापासून तुम्हांला कसलीही भीती बाळगायला नको.

**किशोरी.** वेडं माणूस आपला वेडेपणा कबूल करूं लागलं कीं शहाण्यानं त्याच्यापासून दूर राहावं हेंच योग्य. मी आतां दुलारीची वाट पहात नाहीं. ती येईपर्यंत कृपा करून आमचं हें रिकामं घर संभाळा.

( जाते )

**डोल्हिड.** धांव–धांव निराशे, धांव. आणि आशेच्या दुबळ्या बळानं बलवान् होऊं पाहणाऱ्या या मेलेल्या सजीवाला निर्जीव करून टाक. आशा म्हणते, आशा नाहीं. पण बाई निराशे, तूं कां मला थांबवून धरतेस ? जगणं संपावं म्हणून मी जिवंत होऊं पाहात होतों; पण जिवांत जीवच कां राहत नाहीं ? काय करूं ? मरावं तर जगण्याचं भय वाटतं ! जगावं म्हटलं तर जगायला जागाच राहिली नाहीं. आशा–निराशेच्या या युद्धांत चुरडून जाणाऱ्या दुबळ्या जीवा, आतां तुझा अवतार संपत आला.—

पद—( चाल हनुमंतजीनें हरखो. )

निराधार जीवें जगतां बुडालों बिचारा ॥ ध्रु० ॥
बुडें बिचारा गगनीं तारा नाच नाचतां हांसवितो मजला ।
रडवा मेघ सावरिल त्यांना, माना उदासीन त्या झाल्या आधारा ।
सारा निशेचा पसारा ॥ १ ॥
स्वर्गंगा गगनांगाणीं डोले चंद्रबिंबिंचा रंग फिका झाला ।
सूर्य निमाला काळोखाचा, नाचा तुफानांत वाऱ्याचा आवारा ।
सारा तमाचा फवारा ॥ २ ॥

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश तिसरा.

### स्थळ–रस्ता.

( सुब्रह्मण्य व पुट्टूपंडित. )

**सुब्रह्मण्य.** तें कांहीं नाहीं. आजपर्यंत जसा मी तुमचं ऐकत आलों तसंच तुम्हीं सर्वांनीं माझं ह्मणणं कबूल केलं पाहिजे. धर्ममंडळाच्या

सर्व सभासदांचीं मी मतं घेतलीं, तीं परावर्तनाला अनुकूलच पडलीं. आतां तुमच्या विरोधाला कोण विचारणार ?

**पुट्टू.** तें सारं खरं. पण परंपरेचं काय ? आजपर्यंतची परंपरा मोडून टाकायला शेवटीं तुमच्यासारख्या कट्टया धर्माभिमान्यानंच तयार व्हावं, हें अत्यंत लाजिरवाण आहे.

**सुब्रह्मण्य.** परंपरा सोडायची माझीही तयारी नाहीं; पण त्याचमुळं तुम्हीं स्वतः आणि दुसरे तुमच्यासारखेच आणखी काहीं कट्टे धर्माभिमानी संकटांत पडणार आहेत, त्याची काय वाट ?

**पुट्टू.** आम्हीं असल्या फुसक्या संकटांना मुळींच भीत नाहीं.

**सुब्रह्मण्य.** हें संकट तितकं साधं नाहीं. प्रत्यक्ष तुमच्याच मानेला पहिल्यानं चांगला फांस लागणार आहे.

**पुट्टू.** माझ्या मानेला फांस ? तो कां बुवा ? मी काहीं कुणाचं वाईट केलं नाहीं.

**सुब्रह्मण्य.** दुसऱ्या कुणाचं वाईट केलं नसेल. पण तुम्हीं स्वतःचंच काहीं अनहित केलं असलं तर ? आत्महत्येच्या प्रयत्नाला देखील दुसऱ्याच्या खुनाइतकीच शिक्षा मिळते.

**पुट्टू.** केव्हांही मी आत्महत्येचा प्रयत्न केला नाहीं.

**सुब्रह्मण्य.** पण तसलंच दुसरं कांहीं केलं असेल तर. समजा, मागं किशोरीनं तुमच्यावर केलेले आरोप पुनः कुणी तरी उकरून काढले तर ?

**पुट्टू.** त्याची मला मुळींच भीती वाटत नाहीं. हो—ज्याला कर नाहीं त्याला डर कसला ?

**सुब्रह्मण्य.** पण कुणी पुराव्यासकट त्या गोष्टी सिद्ध करून दाखविल्या—समजा, एखाद्या माणसानं तुम्हांला प्रत्यक्ष मद्यपान केलेल्या स्थितींत आणून धर्ममंडळासमोर उभं केलं. मग ? अर्थातच त्या वेळीं परंपरेला अनुसरून तुमच्यावर बहिष्कार घालणं भाग येईल.

**पुट्टू.** अरेरे ! जगांत इतकीं चांडाळ माणसं आहेत ना ? पुरा कली आला खरा !

**सुब्रह्मण्य.** कली आला खरा पण ही कळ जर आचार्यांसमोर गेली तर तुम्हीं काय कराल ?

**पुट्टू.** साफ नाकबूल करीन. वाटेल ती शपथ घेईन. शंकरावरचं बिल्वपत्र उचलून दिव्य करीन. मग कोण मला म्हणेल ?

**सुब्रह्मण्य.** ज्यानं प्रत्यक्ष पाहिलं असेल तो. शपथ घेतली म्हणून झालेला गुन्हा कांहीं पुसला जात नाहीं. देवापासून आईबापांपर्यंत सर्वांना संकटांत आणलं म्हणून केलेलं कृत्य कांहीं नाशाबित होत नाहीं.

**पुट्टू.** तर मग मी प्रायश्चित घेईन. प्रायश्चित्ताचा बिनतोड गोळीबार तयार असल्यावर बहिष्काराच्या वाघोबाची कुणाला कां भीती वाटेल ? हजार वेळां मद्यमांस खाल्याचा पुरावा झाला तर हजार प्रायश्चित्तं घेऊन पुनः बुचं उघडून हाडं फोडायला काय हरकत आहे ? बाकी मी तसं कांहीं करित नाहीं म्हणा. पण प्रायश्चित्त आहे, तोपर्यंत पापाला भीण्याचं काय कारण आहे ?

**सुब्रह्मण्य.** धर्ममंडळाच्या सभासदांचं म्हणणं तरी हेंच आहे. ते म्हणतात कीं, धर्मबाह्य पदार्थांचं सेवन करणारा ज्या प्रायश्चित्तानं शुद्ध होतो त्याच व्रात्यस्तोम विधीन खिस्ती किंवा मुसलमान झालेल्या माणसाला कां पावन करून घेऊं नये ? नुसत्या कुंडातल्या पाण्याला किंवा अशाच कांहीं पोकळ विधींना कां महत्व द्यावं ? मला आतां संकट आहे तें हेंच कीं, एक तुम्हालोकांना बहिष्कार घालून पतित तरी ठरवलं पाहिजे, किंवा पतिताला तरी पावन करून घेतलं पाहिजे. आतां पुढला मार्ग तुम्हींच सांगा म्हणजे झालं.

**पुट्टू** मोठी पंचाइत आली. पण तुम्हींच या लोकांना कां खोडून काढीत नाहीं ? त्यांना साफ म्हणावं कीं, आमच्या परंपरेंत हें बिलकुल येत नाहीं. असल्या खाण्यापिण्यामुळं घातलेल्या बहिष्कारांना परंपरेंत मुळींच आधार नाहीं. आणि तेंही कांहीं खोटं नव्हे. कुठं आहे असला आधार ? एक परंपरेचं नांव घेतलं कीं, त्याच्या खालीं हवं ते दडपतां येतं.

**सुब्रह्मण्य.** हल्लींचं धर्ममंडळ परंपरेला जुमानील असं मुळींच वाटत नाहीं.

पुट्टू. छे छेः, ही पद्धतच मुळीं चुकली. ही धर्ममंडळाची धोरपड कशाला गळ्यांत बांधून घेतलीत ! होतं तें काय वाईट होतं ! अहो, धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम् । महाजनो येन गतः स पंथः ॥ धर्माचीं तत्वं खबदडींत पडलीं आहेत. म्हणून लठ्ठ लठ्ठ शास्त्री सांगतील तोच खरा धर्ममार्ग. मग ते वाटेल तें सांगेनात ! ऐकलंच पाहिजे !

सुब्रह्मण्य. आतां धर्ममंडळ अस्तित्वांत आलं ना ! लठ्ठ असोत किंवा रोडके असोत, धर्ममंडळाचे सभासद म्हणतील तेंच आतां कबूल करावं लागणार.

पुट्टू. पण माझ्यावर मद्यमांससेवनाचा पुरावा करणार तरी कोण ?

सुब्रह्मण्य. दुलारी.

पुट्टू. ती फटकळ, जहांबाज, नादान, बेशरम, उडाणटप्पू, नखरेल टिटवी ?

सुब्रह्मण्य. हं—हं—खबरदार.

पुट्टू. कां बरं ? आहेच तशी ती.

सुब्रह्मण्य. उद्यांच तिचा माझा विवाह होणार आहे.

पुट्टू. अस्सं. एकूण ती तुमच्या गळीं पडली, म्हणून तुम्हीं माझ्या गळ्याला फांस लावणार; तिनं तुमच्या ओठाला ओठ देऊन तुमचं तोंड बंद केलं, म्हणून तुम्हीं माझी मुस्कुटदाबी करणार; ती तुमचा संसार थाटणार, म्हणून तुम्हीं मला संसारांतून उठविणार ! काय चमत्कार आहे ? सुंदर मुखड्यांतील वाक्यापेक्षां ब्राह्मवाक्य कमजोर ठरावं ना ?

सुब्रह्मण्य. तिचा पुरावा मला पूर्णांशानं ग्राह्य आहे; आणि धर्ममंडळाच्या अनुमतीनं तुम्हांला व तुमच्यासारख्या इतर सर्व मद्यमांसाहारी ब्राह्मणांना पतित ठरविण्याचा मी निश्चय केला आहे.

पुट्टू. मी प्रायश्चित्त घेईन.

सुब्रह्मण्य. डेव्हिडलाही आम्हीं प्रायश्चित देऊन ब्राह्मण करून घेऊं.

**पुट्टू.** असं कसं होईल ? तुम्हीं त्याला ब्राह्मण करून घ्याल; पण त्याचं लग्न कसं होणार ? तो संसारांत कसा पडणार ? अहो सर्वाधिकारी, तुम्हीं माझं ऐका. प्रायश्चितानं त्याला शुद्ध करून घ्या; पण एक अट बाला कीं, कुणाही एखाद्या कुलीन आणि कर्मठ ब्राह्मणानं—अगदीं कर्मठ धर्मनिष्ठ ब्राह्मणानं—आपली मुलगी डेव्हिडला द्यावी आणि त्या मुलीनं स्वेच्छेनं त्याच्याशीं लग्न करायला तयार व्हावं. असंच झालं तर त्याला ब्राह्मण करून घ्या. नुसतं ब्राह्मण म्हटल्यानं कांहीं कुणी ब्राह्मण होत नाहीं. तो आधीं ब्राह्मण समाजांत पूर्णपणें मिसळायला त्याच्याशीं सरसहा रोटीबेटीव्यवहार झाले पाहिजेत. कसं ?

**सुब्रह्मण्य.** खरं आहे. पण त्यांत कांहीं मोठं कठिण नाहीं

**पुट्टू.** ( स्वगत ) तेंच तर सर्वांत कठिण आहे.

**सुब्रह्मण्य.** एवढ्यावरच तुम्हां लोकांचं समाधान होत असलं तर तीही अट घालूं. मग तर झालं ना ?

**पुट्टू.** बस्स. आम्हांला यापेक्षां जास्त कांहीं नको; पण आतां एवढं कबूल केल्यावर मद्यमांसाहाराचा प्रश्न मात्र निघूं द्यायचा नाहीं. हं—अगदीं वचन दिलं पाहिजे.

**सुब्रह्मण्य.** ठिक आहे. हें घ्या वचन.

**पुट्टू.** बाकी दुलारीसारख्या चवचाल पोरीवर—

**सुब्रह्मण्य.** गप्प बसा.

**पुट्टू.** गप्प बसतों. तुमचाच संबंध आहे म्हणून हवा तर गप्प बसतों. पण तुम्हीं देखील जरा विचारानंच लग्न करा.

**सुब्रह्मण्य.** मी केव्हांही अविचार करीत नसतों, हें सर्वत्र महशूर आहे.

**पुट्टू.** तें खरं. पण खिस्त्याशीं गुलगुल गोष्टी करणारी पोरटी एका विद्वान् शास्त्र्याची अर्धांगी—

**सुब्रह्मण्य.** चूप. दुलारीवर माझा पूर्ण विश्वास आहे. तुम्हीं डेव्हिडचा उल्लेख करित असाल तर तो व्यर्थ आहे. बिंदुमाधवजी त्याला अगदीं पोटच्या पोरासारखा वागवितात.

**पुट्टू.** आणि गुलेल्लूसाहेबांना देखील बिंदुमाधवजींनीं दत्तक घेतलं आहे वाटतं ?

**सुब्रह्मण्य.** कुठला गुलेल्लूसाहेब ?

**पुट्टू.** इथल्या मिशनहाऊसचे सर्वाधिकारी. त्यांच्या बंगल्यावर जाऊन तासाचे तास ती गप्पा मारित बसते, तिथंच तर तिनं तें पाहिलं ना ?

**सुब्रह्मण्य.** काय तिथं पाहिलं ?

**पुट्टू.** तें हें. तिथंच तिनं पाहिलं आणि सटवीनं तुमच्याकडे चहाडी केली.

**सुब्रह्मण्य.** दुलारी मिशनहाऊसमध्यें कां जाईल ? हें निवळ तुमचं कुभांड दिसतं.

**पुट्टू.** ते पहा, गुलेल्लूसाहेब येताहेत. त्यांच्या पाठोपाठ या चर्चच्या कपौंडांत जाऊन लपून बसा, म्हणजे खरं काय तें आपोआप कळेल. मी जातों. मी आलों तर ते मला चटकन् ओळखतील. या इथं उभे रहा. छे:, आलेच ते. मी जातोंच आतां. इथं उभं राहून ऐका म्हणजे कुणी तुम्हांला पाहणार नाहीं. ( जातो )

**गुलेल्लू.** ( प्रवेश करून ) मी बालपणींच ख्रिस्ती झालों होतों. समज येईपर्यंत जर माझें धर्मांतर झालें नसतें तर मी ख्रिस्ती झालों असतों काय ? मला शंकाच वाटते. कां कीं, आतां मला पुनः हिंदू व्हावें असें वाटूं लागलें आहे. या दुलारीनें तर मला वेडच लाविलें आहे. पण मालनवर माझें प्रेम आहेच. दोघींबरोबरही लग्न करावें काय ? पण ख्रिस्ती राहून तें कसें साधेल. हिंदू लोकांना वाटेल तितकीं लग्नें एकाच वेळीं करतां येतात, हा केवढा फायदा आहे ? कृष्णानें सोळा हजार बायका केल्या, म्यां सोळा बायकांवरसुद्धां तृप्त होईन. पण द्रौपदीला पांच नवरे होते, हें

मालनला कळूं देतां कामा नये. समजा, दुलारीशीं लग्न केल्यावर ती मेली —छेः पण नकोच ही कल्पना— तरी पण उदाहरणासाठीं घेऊं. ती मेली, तरी तिच्या बहिणीशीं मला लग्न करितां येईल. ख्रिस्त्याला अगदीं जवळच्या नात्याच्या स्त्रीशींदेखील लग्न करतां येतें पण बायकोची बहिण मात्र वर्ज करावी लागते. हा काय अन्याय! एकंदरींत लग्नाच्या बाबतींत तरी हिंदुधर्म फार उदार आहे. मग म्यां हिंदू कां होऊं नये? कां कीं, मला लग्नें करायचीं आहेत. पण कबूल केल्याप्रमाणें दुलारी अझून कां येत नाहीं? लग्नें करायचीं, असें मी म्हणतों खरें पण बायकांशिवाय लग्नें कशीं होणार? दुलारीचें माझ्यावर प्रेम दिसतें खरें पण अझून खात्री पटत नाहीं. आतांच तिनें एथें यायचें कबूल केलें होतें. अझून कां बरें आली नाहीं? आज त्यांच्या आचार्यांची गादीवर पुनः स्थापना व्हायची होती, तिकडे अझून समारंभ न आटोपल्यामुळें-अरे, पण आलीच ती!

**दुलारी.** उशीर झाला म्हणून तुम्हीं खूपच रागावला असाल? पण काय करूं? समारंभ आटोपल्याशिवाय मधूनच कसं येतां यावं?

**गुलेल्ल.** छेः छेः, मला मुळींच राग आला नाहीं. कां कीं, मी जगाच्या अंतापर्यंतही आनंदानें तुझी वाट पाहत राहिलों असतों.

**दुलारी.** पण अशी वेळ केव्हांच न येवो. मग काय ठरलं तुमचं?

**सुब्रह्मण्य.** ( कठड्या आडून ) अग चांडाळणी!

**गुलेल्ल** झाला निश्चय तो कायम. मी हिंदू व्हायला तयार आहें. कां कीं, म्यां तुझें प्रिय करावें, हा माझा स्वाभाविक धर्म आहे.

**दुलारी.** परावर्तनाचा अर्ज लिहून तयार केलात का?

**गुलेल्ल** तो तूंच मला लिहून दे. ही एक हायहाय केव्हां संपेल असें मला झालें आहे. पहा, मी उपनिषदांचीं भाषांतरें वाचलीं. तीं फारच उत्तम असावीं, अशी माझी खात्री झाली आहे. कांकीं, त्यांतील एकही सूत्र मला कळलें नाहीं. यावरूनच हिंदुधर्माची श्रेष्ठता मला पटली. धर्मग्रंथाचा अर्थ जितका बिकट, जितका परस्परविरोधी असेल, तितकाच तो धर्म श्रेष्ठ असला पाहिजे.

**दुलारी.** तुम्हीं म्हणतां तितके आमचे धर्मग्रंथ त्रिकट नाहींत; पण आमच्या धर्माकडे पूर्वी तुम्हीं ज्या दृष्टीनें पाहात होतां ती दृष्टी निवळल्याशिवाय त्याचा अर्थ तुम्हांला कळणार नाहीं.

**गुलल्ल.** तुझें म्हणणें यथार्थ आहे. आम्हीं आजपर्यंत या ग्रंथांकडे कुत्सितदृष्टीनेंच पाहत होतों. पण प्रिय दुलारी, तुझ्याकडे पाहतांना मात्र माझी दृष्टि नुसती निर्मळ होऊं लागली इतकेंच नव्हे, तर तुझ्या सौंदर्याच्या धवलतेमुळें माझ्या डोळ्याच्या पापण्यादेखील पांढऱ्या होऊं लागल्या. म्यां कृतकृत्य व्हावें, म्हणूनच तुझ्या अनुज्ञेनें म्यां भाषा सुधारली.

**दुलारी.** तरी पण भाषेची दुरुस्ती करतांना हें ' म्यां ' मात्र नवीनच उचललं. आणि ' कांकीं ' तर कायमच आहे. या तुमच्या ' म्यां 'ला आणि ' कांकीं 'ला हाय हाय !

**गुलेल्लू.** एवढे जुने संस्कार एकदम कसे जावे ? पण दुलारी, मला आधीं आशा दे. Do you really care for me ? तूं माझ्याविषयीं काळजी करतेस ना ?

**दुलारी.** तुमची मला फारच काळजी वाटते !

**गुलेल्लू.** अहाहा ! मी माझ्या सारखाच भाग्यवान् ! प्रिय दुलारी— प्रिय दुलारी !–( पहात राहतो )

**सुब्रह्मण्य.** ( एकीकडे ) प्रिय दुलारी ? आणि हें ही ऐकून घेते ! अरेरे ! स्त्री ती स्त्रीच !

**गुलेल्लू.** प्रिय दुलारी, तूं झगा घातला असतास तर त्याच्या झालरी म्यां चुंबिल्या असत्या !

**दुलारी.** आतां पुनः ' म्यां ' आलं तर तुम्हांला चुंबतच बसावं लागेल.

**गुलेल्लू** असें म्हणूं नकोस. तुझ्या संगमरवरी करकमलावर मला माझे ओष्ठ स्थापूं दे. ( स्वगत ) किती काव्यमय वाक्य जमलें हें !

**दुलारी.** आम्हां हिंदू लोकांत हाताचं चुंबन घेण्याची चाल नाहीं. एवढंच नव्हे, तर कुणाही कुमारिकेनं पुरुषाला स्पर्शसुद्धां करतां कामा नये असा आमचा निर्बंध आहे.

**गुलेल्लू.** अरेरे ! ही दुसरी हायहाय उत्पन्न झाली !

**दुलारी.** तुमच्या ' हायहाय'ला हायहाय !

**सुब्रह्मण्य.** ( एकीकडे ) चांडाळणी, तुला हाय हाय करितच बसायला लावलं पाहिजे.

**गुलेल्लू.** तर मग लग्न होईपर्यंत मी अधन्यच राहावें ना ? म्यां-नव्हे नव्हे मी सुखी व्हावें तें परावर्तनानंतरच ना ?

**दुलारी.** अर्थात्. आधीं परावर्तनाचा अर्ज लिहून आणा पाहूं.

**गुलेल्लू.** पण प्रिय दुलारी, माझें मालनवरही प्रेम आहे. तिलाही हिंदू करून घे. हिंदू झाल्यावर मला तिलाही कृतार्थ करितां येईल, असें होईल ना ?

**दुलारी.** तुमचें मालनशीं लग्न होण्यासाठीं मी वासवदत्तेची अनुकारी होईन.

**सुब्रह्मण्य.** ( एकीकडे ) अरे ! ही सवत पाहायलाही कबूल झाली !

**गुलेल्लू.** आतां दुलारी, आतां मी हे शेवटचे गुडघे टेंकतों. आतां तूं माझी देवता झालीस.

**दुलारी.** उठा—पळा. ती पहा मालन आली ममतेला घेऊन.

**गुलेल्लू.** बरें तर मी पळतों—पण अर्जाचा नमुना लवकर दे. हा माझा हात आतां तुझाच होणार म्हणून तो तुझाच समजून मी त्याचें चुंबन घेतों. धन्य धन्य मी ! ( जातो )

**मालन.** ( ममतेसह प्रवेश करून ) झाला माझा अर्ज मंजूर ? तर मग हिचाही आणखी एक अर्ज घ्या. ही देखील हिंदू व्हायला तयार झाली आहे.

**दुलारी.** एक मोठी पंचाईत आली आहे. या परावर्तनाच्या बाबतींत धर्ममंडळानं लग्नाची अट घातली आहे. ज्याचं किंवा जिचं परावर्तनानंतर लग्न होणं शक्य असेल, त्याचाच अर्ज मंजूर व्हायचा आहे.

**मालन.** तर मग माझ्या परावर्तनाची खात्री झालीच म्हणायची. कारण डेव्हिडरावही हिंदू होणार आहेत.

**दुलारी.** आणि डेव्हिडरावांनीं नाकबूल केलं तर ?

**ममता.** गुलेल्लूसाहेब देखील हिंदू होताहेत ना हो ? मी आपली त्यांच्याशींच लग्न करीन.

**मालन.** हं—तें आधींच ठरवूं नकोस. डेव्हिडरावांनीं नाकारलं तर—

**दुलारी.** गुलेल्लूसाहेबांशीं तुम्हीं लग्न कराल का ?

**सुब्रह्मण्य.** ( एकीकडे ) हा काय चमत्कार ?

**दुलारी.** कराल का लग्न त्यांच्याशीं ?

**मालन.** पण तुमचं त्यांच्यावर प्रेम आहे ना ?

**दुलारी.** तें सारं तुला मागाहून कळेल. पण तूं कबूल आहेस का ?

**ममता.** मी कबूल आहें. खरोखरच मी कबूल आहें.

**मालन.** मी बरी ऐकेन. डेव्हिडरावांनीं नाहीं म्हटलं—काय करूं ? नाहीं म्हणतील का हो ते ?

**दुलारी.** कुणी सांगावं ? त्यांचं कांहीं तुमच्यावर प्रेम असेलसं वाटत नाहीं. समजा, त्यांनीं नाहीं म्हटलं—मग ?

**मालन.** आतां मला विचार केला पाहिजे.

**ममता.** मला नको विचार करायला. मी आहें कबूल. मी आतां सुद्धां लग्न करायला कबूल आहें. अहो, आम्हांला काय ? आम्हीं मूळचे जरी ब्राह्मण असलों तरी वाटेल त्या जातीच्या खिस्त्याशीं आम्हाला लग्न लावावं लागतं. त्यांत आम्हांला कांहीं आनंद का होत असतो ? काय सांगू बाई, पूर्वींपासून जर तुम्हीं आम्हांला आंत घेतां, तर आज कित्येक मिशनें सुनीं पडलीं असतीं.

**दुलारी.** म्हणूनच आतां आम्हीं तुम्हांला अटीवर आंत घेत आहोंत. पुढं या अटीही नाहींशा होतील. हिंदू समाजाच्या किल्ल्याला पाडलेलं हें लहानसं गवाक्ष आतां तुम्हीं लोकांनीं बाहेर गर्दी केली म्हणजे आपोआपच वाढूं लागेल आणि या छोट्या खिडकीचा बडा दिल्ली दरवाजा व्हायला मुळीच वेळ लागणार नाहीं. हं मालन, काय तुझा बेत ठरला सांग पाहूं ?

**मालन.** डेव्हिडरावांना पुनः एकदां विचारून पाहतें.

**ममता.** अग, कसलं प्रेम घेऊन बसली आहेस? मिशन हाऊसमध्यें कोण विचारतं आहे या प्रेमाला? लग्न झालं म्हणजे झालं. आपलं खातंपितं स्थळ पहावं. आम्हां गरिबांना काय करायचं आहे या प्रेमाच्या चोंचल्याशीं.

**दुलारी.** ममतेचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं. तुम्हीं लग्नासाठीं अर्जांत गुलेलूसाहेबांचंच नांव घाला.

**सुब्रह्मण्य.** ( एकीकडे ) मी अगदींच फसलों. हें दुलारीचं सारं ढोंग दिसतं.

**दुलारी.** विचार कसला करतां? हेंच कायम समजा म्हणजे झालं.

**ममता.** पण मग मी काय करूं?

**दुलारी.** तुमचं लग्न जुळवून देतें पुट्टुपंडिताशीं. तुम्हीं मूळच्या ब्राह्मण आहांतच, तेव्हां तेंही सहज जुळून येईल.

**सुब्रह्मण्य.** ( पुढें येऊन ) दुलारी—

**दुलारी.** पळा पोरींनों, पळा. झाला हाच बेत कायम बरं. ( त्या जातात )

**सुब्रह्मण्य.** दुलारी, हें काय गौडबंगाल आहे?

**दुलारी.** हें गौडही नाहीं आणि बंगालही नाहीं. हा नुसता मद्रासचा द्राविडी प्राणायाम आहे.

**सुब्रह्मण्य.** गुलेलूला तूं काय सांगत होतीस?

**दुलारी.** या मालनला आतां जें सांगितलं नाहीं तें. समजलं? आतां मला तुमचंही परावर्तन केलं पाहिजे अहो दुलारीचे सर्वाधिकारी, तुम्हीं अगदीं घाबरूं नका. प्रेमाला मत्सर शोभत नाहीं. जिथं प्रेम पाहिजे तिथं पूर्ण विश्वास असावा लागतो. संशयानं संशय वाढतो तसाच विश्वासानं विश्वासही वाढतो.

**सुब्रह्मण्य.** दुलारी, खरोखरच तूं मला वेड लावणार. तुझा प्रत्येक शब्द मला वेदतुल्य वाटतो. एव्हांच मला एवढी नाचवतेस तर उद्यां लग्न झाल्यावर काय करशील कोण जाणे? एखादा ब्रम्हनिष्ठ ऋषिसुद्धां इतका

वेदप्रामाण्य मानित नसेल ! कुणी भक्त देखील भगवंताला इतका भाळला नसेल ! एखादा महासागर देखील इतका पृथ्वीच्या मर्यादेंत रहात नसेल. धिक्कार असो शंकराचार्याला आणि त्याच्या संन्यासाला ! दुलारी, तूं आहेस म्हणूनच जग आहे. तूं नसतीस तर-तूं नसतीस तर-

**दुलारी.** सुब्रह्मण्यशास्त्री शंकराचार्य होऊन शेवटीं रडत बसले असते. कदाचित संन्यास घेऊन पतितही झाले असते. तें आतां कशाला ? चला आधीं घरीं.

( जातात. )

---

### प्रवेश चवथा.

**स्थळ**—बिंदुमाधवजींचें घर.

( बिंदुमाधव. )

**बिंदुमाधव.** इतकीं वर्षं हृदयांत जपून ठेवलेला हेतू आतां प्रत्यक्ष फलद्रूप होणार, अशीं चिन्हं दिसूं लागलीं आहेत. हे सर्वसाक्षी भगवंता, आजन्म तुझं स्मरण करित असतांना तुझ्यापाशीं जी याचना करीत आलों ती सफल झाल्याचं या वृद्ध नेत्रांना दाखवशील का ? समाधिस्त श्रीच्या अनुज्ञेनं त्यागराजाला सर्व हिंदुस्थानभर फिरवून उभयपद्धतीचं शिक्षण देतांना मी याच आशावृक्षाच्या बीजांचं त्याच्या हृदयांतही संवर्धन करवीत होतों, त्याचं कार्य झालं. त्यागराजानं आपण खराखरा त्यागराज आहे, हें जगाला पटवून दिलं. वैभवाची धगधगणारी मशाल मालवून दारिद्र्याच्या घनघोर काळोखांत त्यानं प्रत्यक्ष प्रवेश करून दाखविला. त्या काळोखांतून खेंचून आणून जगाच्या प्रकाशांत त्याला उभा करण्याचं श्रेय संपादन करणाऱ्या अनाथ डेव्हिडला ईश्वरा, तू ब्राह्मण्याचा सूर्य दाखविणार नाहींस का ? निधड्या हृदयानं सर्व देशांत फिरून बहुमताचा जोर पैदा करणाऱ्या माझ्या लाडक्या किशोरीच्या प्रयत्नांनीं पुनरुद्धारित झालेल्या या आचार्य-पीठाला परावर्तनाची ध्वजा लावण्याचा अग्रमान देणार नाहींस का ? आजन्म परार्थ देह झिजवूं इच्छिण्याची दैवी महत्वाकांक्षा बाळगणाऱ्या या बिंदुमाधवाला देह ठेवण्यापूर्वीं एवढी कृतार्थता देशील का ? हे सकल

चराचरनियामका, परंपरेच्या मायावी मोहजालांत गुरफटून उगवत्या सूर्या-कडे डोळेझांक करूं पाहणाऱ्या आमच्या हिंदूसमाजाचे डोळे असेच झाकलेले राहणार आहेत का ?

श्री. ( प्रवेश करून ) डोळे उघडले, गुरुजी, या तुमच्या मूढ शिष्याचे डोळे आज उघडले.

**बिंदुमाधव.** काय झालं ?

**श्री.** परंपरेच्या वृथाभिमानानं मूढ झालेल्या हिंदुसमाजाला आपलं हितसाधन कळत नाहीं, हें कळून आज माझे डोळे उघडले. गुरुजी, सहा महिन्यापूर्वी मी पत्करलेला मार्गच योग्य होता, असं आतां मला वाटतं. पुढं जाऊं पाहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला आमचा समाज असाच पायबंद घालून मागं ओढणार. आपण मरून दुसऱ्यालाही असाच बुडवीत राहणार. यापेक्षां आत्मचिंतनांत काळ घालविण्यासाठीं अरण्याचा मार्ग धरलेला काय वाईट ?

**बिंदुमाधव.** ब्रह्मनिष्ठांनाही वंदनीय होणाऱ्या माझ्या प्रिय शिष्या, अरण्यांत गेलं म्हणजे कांहीं जगाचा पसारा बंद होत नाहीं. तूं दूर झालास म्हणून जग कांहीं नाहींसं होत नाहीं. तुझ्या अस्तित्वानंच जगाचं कल्याण होइल. तूं जग सोडल्यानं जगाचा कोणता फायदा साधेल ? माझी अनुज्ञा पाळून—प्रतिनिधि स्वरूपानं कां होईना तूं गादी पत्करलीस हेंच योग्य झालं. तुझा तो त्याग अंतीं आततायीपणाचा ठरला असता. शंकराचार्य या संस्थेचा त्यामुळं नायनाट झाला असता. हल्लींचे शंकराचार्य समाजाला नुसते भारस्वरूप झाले आहेत यांत शंका नाहीं; पण ते कसे असले पाहिजेत हें कुणी दाखवावं ?

**श्री.** गुरुजी, धर्ममंडळाची रचना करितांना त्याचा उपयोगच होईल, असं वाटलं होतं; पण आतां तें खोटं ठरणार. लोकसत्तात्मकपद्धति अम-लांत आणतांना परंपरेच्या वृक्षाचीं मूळं किती खोल गेलीं आहेत, याचा अंदाज मला झाला नाहीं.

**बिंदुमाधव.** हा वृक्ष अक्षय्यवटापेक्षांही पुराणा आहे. एका हिस-क्यानं ता उखडून निघणार नाहीं. तसं करतांना नुसता हाताला धक्का बसेल.

श्री. तसंच झालं. पुराण्या पुरोहितांनीं धर्ममंडळावर वजन पाडलं आणि त्यांनीं एक विलक्षण अट पुढं मांडली. कुणीही धर्मनिष्ठ कुलीन ब्राह्मण आपली मुलगी डेव्हिडला देईल तरच योग्य तें प्रायश्चित देऊन डेव्हिडला ब्राह्मण करून घ्यावा, असा ठराव सर्वानुमतें पसार झाला.

बिंदुमाधव. अगदीं योग्य तेंच झालं. नुसत्या परावर्तनाच्या ठरावानं डेव्हिडचं ब्राह्मण्य सिद्ध झालं नसतं.

श्री. पण जमलेल्या सर्व ब्राह्मणांतून कुणीच या कार्याला तयार होईना. जे तयार झाले त्यांना धर्मविरोधी सुधारक ठरवून इतरांनीं बहुमतानं हाणून पाडलं.

बिंदुमाधव. शंकराचार्यांचा पुरोहित धर्मद्वेषी ठरेल का ?

श्री. म्हणजे ? आपल्या धर्मनिष्ठतेला कोण नांव ठेवील ?

बिंदुमाधव. मी माझी मुलगी आनंदानं डेव्हिडला अर्पण करतों.

श्री. काय ?

बिंदुमाधव. आपल्या पुराण्या आईच्या संमतीनं—नव्हे आग्रहानं—छत्रपती शिवरायांनीं आपली मुलगी बाटलेल्या बजाजीच्या मुलाला दिली होती ना ? त्या शककर्त्या शिवाजीचं मी नुसतं अनुकरण करीत आहें. तसं न केलं तर जग माझी गणना कर्तृत्वहीन बोलघेवड्यांत करूं लागेल. हा संसारी लोकांचा त्याग संन्याशाला हृदयगम्य होणार नाहीं. माझी किशोरी मी डेव्हिडला दिली.

श्री. किशोरी ? गुरुजी, किशोरी तर हल्लीं एक संन्यासिनीच बनली आहे.

बिंदुमाधव. त्यागाच्या प्रकाशानं भारतभूमीला दिपवून टाकण्यासाठीं संन्यासिनीनं संसार थाटावा; त्यागाचा त्याग करून वैराग्याची परमावधी पटवून दाखवावी आणि मृतप्राय झालेल्या एका शुद्ध जीवाच्या उद्धारानं परंपरेच्या खोल गर्तेत गढून गेलेल्या समाजाला माझ्या किशोरीनं उदाहरणस्वरूप व्हावं.

श्री. पण धर्ममंडळाच्या अटीप्रमाणें याला तिचीही संमती पाहिजे.

**बिंदुमाधव.** ती मिळविण्याची कामगिरी मी आचार्यांवरच संपवितों. संसारी मनाला त्यागाचा उपदेश करण्याचा अधिकार फक्त संन्याशालाच आहे. वैराग्याची शाब्दिक बडबड करणाऱ्या माझ्यासारख्या संसारांतल्या कीटकाचं तें काम नव्हे. इथंच रहा. मी किशोरीला पाठवून देतों. ( जातो )

**श्री.** खरा त्यागी कोण ? मी कीं हे ? माझं मन घाबरूं लागलं. संन्यास घेऊन संसार मोडणारा मी—मीच किशोरीला संसारी होण्याचा उपदेश करूं ? किशोरीला उपदेशाचे चार शब्द सांगणं म्हणजे देखील मला मोठं संकट वाटतं. अर्थपूर्ण चारच शब्दांनीं माझ्या तात्कालिन बधिर झालेल्या हृदयांत जिन वैभवाचं संकट टाळण्याची स्फूर्ति उत्पन्न केली, त्या माझ्या गुरुदेवतेला मीच कसा उपदेश करूं ? हृदया, ईश्वराची भावना बळकट कर. जिव्हे, ईश्वरस्मरणानं धीट हो. नेत्रांनो, ईश्वरस्वरूपदर्शनानं तृप्त व्हा, तरच यावेळीं किशोरीसमोर राहण्याचा या देहाला अधिकार येईल. आली—किशोरी आली- जय भगवन्. ( किशोरी येते )

**किशोरी.** स्वामीजींनी मला कां बोलावलं ?

**श्री.** किशोरी, संसाराविषयीं तुझं काय मत आहे ?

**किशोरी.** संसाराचा विचार संन्याशांना कशाला पाहिजे ?

**श्री.** विषयीजनांच्या संसारापेक्षां संन्याशाचा संसारच व्यापक असतो....

**किशोरी.** संन्याशाचा संसार ? किती परस्परविरोधी शब्द आहेत हे !

**श्री.** विरोधाचं निर्मूलन होऊन ते शब्द सार्थ व्हावे, असं तुला वाटतं का ? तर मग संसारी हो.

**किशोरी.** कुणाचे शब्द हे ! हे शब्द उच्चारणारा संन्यासी संन्यासीच आहे ना !

**श्री.** संसारीजनांनीं विषयत्यागानं संसारी व्हावं म्हणूनच एक संन्यासी हे शब्द उच्चारित आहे.

**किशोरी.** पण संसारत्यागी संन्यासिनीला ते ऐकण्याची आवश्यकता वाटत नाहीं.

**श्री.** किशोरी, धर्ममंडळानं डेव्हिडच्या परावर्तनाला घातलेली अट तुला कळली ना? आतां पुढं कसं होणार?

**किशोरी.** तें मी काय सांगूं? डेव्हिडच्या परावर्तनासाठीं मी कांहीं तळमळत नव्हतें. ( स्वगत ) मी खोटं बोललें का?

**श्री.** पण तुझे बाबा?-किशोरी, गुरूजींच्या शब्दाची तुला किंमत आहे ना?

**किशोरी.** पितापुत्रींच्या नात्याची चर्चा करण्याचा परस्थांना अधिकार नाहीं.

**श्री.** अर्थात् नाहीं. पण किशोरी, त्यागराज परस्थ आहे का? ( किशोरी स्तब्ध राहते ) किशोरी, त्यागराज परस्थ आहे असं म्हणण्याचं धाडस मुळींच करूं नकोस. तुझे बाबा तरी तुला परके नाहींत ना?

**किशोरी.** असं म्हणण्याचा उद्देश?

**श्री.** उद्देश तुझ्या बाबांनाच विचार. डेव्हिडचं परावर्तन व्हावं म्हणून तुझ्या बाबांनीं–किशोरी घाबरूं नकोस, मन घट्ट कर–ऐक. तुझ्या बाबांनीं आपली वडील मुलगी डेव्हिडला अर्पण केली.

**किशोरी.** काय म्हटलंत?

**श्री.** तुझ्या बाबांनीं किशोरीचं डेव्हिडशीं लग्न ठरविलं.

**किशोरी.** गुलामांचा व्यापार बाबांनीं केव्हांपासून सुरू केला?

**श्री.** जगत्कार्यासाठीं अलौकिक स्वार्थत्यागाची ईश्वरानं त्यांच्या हृदयांत प्रेरणा केली तेव्हांपासून. ईश्वरीइच्छेचे गुलाम गुलामांचा व्यापार करायला भीत नाहींत.

**किशोरी.** या भारतवर्षांत गुलामांचा व्यापार रुजू नाहीं.

**श्री.** हरिश्चंद्राच्या तारामती रोहिताश्वांनीं तो एकाकालीं चिरस्मरणीय करून ठेविला आहे. हरिश्चंद्र भारतवर्षाचा आदर्श आहे असं नाहीं का तुला वाटत? रंतिदेवाचा स्वार्थत्याग नाहीं का तुला आठवत?

**किशोरी.** जुन्यापुराण्या पुराणांचे आधार अंधश्रद्धाळू भाविकांसाठीं आहेत.

**श्री.** जाज्वल्य श्रद्धेच्या मूर्तिमंत पुतळ्यांना त्यापासून कांहींच धडा घेतां येणार नाहीं का ? ( किशोरी स्तब्ध राहते ) किशोरी, ताजा इतिहास देखील आज पुराणा झाला असं तूं म्हणणार नाहींस ना ? शिवाजी-महाराजांनीं काय केलं ? त्यांचं अनुकरण करणं बिंदुमाधव गुरूजींच्या भारतव्यापी लोकप्रियतेला जास्त उज्ज्वल करणार नाहीं का ? एका दीनदुबळ्या अनाथ जीवाच्या उद्धारानं तूं आपल्या जन्मदात्या पित्याची कीर्ती चिरंतन करणार नाहींस का ?

**किशोरी.** मतस्वातंत्र्याचा माझ्या बाबांना फार अभिमान आहे, तो इतका मर्यादित आहे का ? नुसता दुसऱ्यांना उपदेश करण्यासाठींच ते मतस्वातंत्र्याचा वडिवार बडबडत होते का ? त्यागराज, बाबांनीं तुह्मांलाच हें वकीलपत्र दिलं आहे वाटतं ? किशोरीच्या देहविक्रयाची हकीगत स्वतःच्या तोंडानं तिला सांगण्याची त्यांना भीती वाटली-कीं शरम वाटली ?

**श्री.** किशोरी, रागाला डोळे नसतात. मन शांत ठेवून शब्द बोल.

**किशोरी.** प्रेमाची पायमल्ली करूं पाहणाऱ्या संन्याशानंच आधीं मन शांत ठेवावं. संन्यास घेतला ह्मणून स्त्रियांचं हृदय काहीं ओळखतां येत नसतं.

**श्री.** ह्मणूनच ह्मणतों, संसारी हो आणि नंतर पुरुषांच्या हृदयाची परीक्षा कर.

**किशोरी.** पुरुषांना असतं का हृदय ?

**श्री.** पुरुषाच्या हृदयाच्या आश्रयाशिवाय तें तुला मुळींच कळणार नाहीं. किशोरी, तुला उपदेश करण्याचा मला अधिकार नाहीं. तुझी प्रार्थना करावी हाच माझा अधिकार आहे. एका दीनाच्या उद्धारासाठीं तळमळणारा एक दुसरा दुबळा जीव तुझ्या पायावर मस्तक ठेवून—

**किशोरी.** स्वामीजी, हें काय ? संन्याशानं कुणाला नमस्कार करूं नये.

**श्री.** सर्वांच्या ऋणांतून मुक्त झालेला संन्याशी आपल्या मातेच्या पायावर डोकं ठेवल्यावांचून धन्य होत नाहीं. संन्यास घेतला तरी कुणी मातृऋणांतून मुक्त होत नाहीं. किशोरी, माझ्या गुरुदेवते, माझ्या मातृ-देवते, विषयलालसेचा कलंक न लागतां ईश्वरीसंसाराचा पसारा वाढण्या-

साठीं तूं स्वेच्छापूर्वक डेव्हिडचं पाणिग्रहण कर. आपल्या ईश्वरी तेजानं भारतवर्षाचे मिटलेले डोळे उघडून दे. त्यागाच्या त्यागानं जगद्विजयी हो.

**किशोरी.** परोपदेशे पांडित्य करणं फार सोपं आहे. त्यागराज, हा त्याग करणं मला फारसं कठीण नाहीं. यांत कसला स्वार्थत्याग? दोरी बांधून दिलेल्या गाईप्रमाणं वाटेल त्याच्या दारीं रवथ करित बसण्याची कुणाही हिंदुमुलीला जन्मसिद्ध सवय आहे. एकाद्या ह्यातार्‍याच्या घरीं एकादी दशवर्षीया बालिका सुद्धां आनंदानं संसार थाटते. बापाच्या इच्छेनं एकाद्या कुश्चळ रोग्याच्या गळ्यांत गळा घालून दुःखमय आयुष्य कंठित बसायला कुठल्याही हिंदु मुलीला दिक्कत वाटत नाहीं. मग परावर्तित सत्पात्र ब्राह्मणाशीं लग्न करायला मी पित्राज्ञेचं उल्लंघन कां करीन? पण त्यागराज, इतर हिंदूमुलींप्रमाणं पारतंत्र्याच्या सांखळीनं बांधून माझ्या बाबांनीं मला आपल्यामागून कुत्र्यासारखं हिंडवलं नाहीं. तोंड बांधून बुक्क्यांचा मार देऊन त्यांनीं मला नाटकी आज्ञाधारक बनविण्याचा केव्हांही प्रयत्न केला नाहीं. त्याच माझ्या बाबांनीं माझ्या मनावर ताबा चालवून मला गुलामासारखं देहविक्रय करायला लावावं अं? नाहीं—त्यागराज, बाबांच्या असो किंवा तुमच्या असो आज्ञेनं, अनुज्ञेनं किंवा विनंतिनं आपल्या मनाला दाबून सवंग लोकप्रियतेला बळी पडण्याइतकी ही किशोरी दुबळी नाहीं. असली लोकप्रियता पायाखालच्या सहज रगडल्या जाणार्‍या एका धुळीच्या कणाइतकी किशोरीला मातीमोल वाटते, असं बाबांना सांगा. जा. माझं मन माझं! त्याच्यावर बाबांचा अधिकार नाहीं किंवा दुसर्‍या कुणाचाही नाहीं.

**श्री.** किशोरी, या अफाट विश्वाला आपल्या चिमुकल्या हृदयांत कोंडून ठेवण्यासाठीं केलेल्या स्वार्थत्यागापुढं डेव्हिडचं ब्राह्मण्य कःपदार्थ आहे. त्यागाचा त्याग करून आम्हां संन्याशांनांही खालीं पाहायला लावण्याची ही सुसंधि साध.

**किशोरी.** ज्या दिवशीं तुमचा संन्यास कबूल करून मी तुम्हांला नमस्कार केला, त्याच दिवशीं मीही संन्यासिनीच झालेः—

पद—( बिहागडा झपताला. )

या हृदयिं कामना साध्य नच राहिली । प्रेमकलिका मला विगत-
मधु जाहली ॥ धृ० ॥ गुणपाश छेदिला । त्यागशरिं वेधिला ।
वाहतें रुधिरजल । शांति नदि आटली ॥ १ ॥

श्री. किशोरी, माते, मी हरलों. तुझ्या बाबांच्या आज्ञेनं मी तुला उपदेश करण्याचा प्रयत्न केला, त्याची मला क्षमा कर. तुझ्या मनाच्या समाधानापुढं मला डेव्हिडच्या परावर्तनाची काडीभरही किंमत वाटत नाहीं. जा, स्वतःच्या स्वातंत्र्यानं स्वतंत्र संन्याशाचा तेजोभंग करणाऱ्या देवते, मी तुला प्रणिपात करतों—

पद—( चाल—गरज घुमंडमें बिजली. )

मृदुल कठिनता बघुनि सुदति तुझी हृदयिं विकल करि लाज मज ॥ ध्रु.॥

जगति पराजिता तव विभवानें । युवतिजनां शिरताज तूं ॥ १ ॥

**दुलारी.** ( प्रवेश करून ) घात झालासं वाटतं ! कुठं आहेत बाबा ? स्वामीजी, आधीं सांगा, बाबा कुठं आहेत?

**श्री.** ते घरांतच कुठं तरी असतील. काय झालं दुलारी ?

**बिंदुमाधव.** ( प्रवेश करून ) काय झालं दुलारी ?

**दुलारी.** डेव्हिड जोशी एकाएकीं कुठं नाहींसे झाले आणि त्यांच्या खोलींत मला हें पत्र सांपडलं.

**बिंदुमाधव.** कुणी उघडलं हें पत्र. ( वाचूं लागतो. )

**दुलारी.** मला क्षमा करा. फाजिल जिज्ञासेनं मी तें उघडलं.

**बिंदुमाधव.** एका अर्थी बरंच झालं. किशोरी, हें पत्र मोठ्यानं वाच.

**किशोरी.** ( वाचते ) गुरुवर्यांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात. गुरुजी, शेवटीं निराशाच विजयी झाली. मी काय करूं ? पतिताला दारीं कोण उभा करील ? 'तुमची मुलगी मला द्या ' असं मी ख्रिस्ती या ब्राह्मणांना कुठल्या तोंडानं सांगूं ? आत्म[illegible] आतां मार्ग नाहीं. हा देह मला असह्य वाटतो. शेवटची [illegible] म्हणूनच एवढीच कीं, माझ्या बाबांच्या थडग्याशेजारीं पडलेल्या माझ्या देहाला अग्नि द्या. पुरूं नका. आणि माझ्या अस्थिचं गंगेंत वि[illegible] करा. मरण्यापूर्वीं एकदा मन मोकळं करावंसं वाटतं. मृत्यू[illegible] [illegible]चा प्रवेश होत नाहीं. किशोरीला सांगा—( किशोरी थाबून वाच[illegible]. )

**बिंदुमाधव.** देहा[illegible] झाली तर देवाचीसुद्धां भेट होते. पण किशोरीसारख्या मानवी म[illegible] [illegible] दयेचा द्रवदेखील येत नाहीं अं ?

आ. वाच-किशोरी, पुढं वाच.

दुलारी. तात्पर्य समजलं. आतां आधीं कबरस्थानाकडे चला.

किशोरी. नाहीं. तुम्हीं कुणीच येऊं नका. मी एकटीच त्यांना सोडवून आणीन. ( जाते. )

बिंदुमाधव. कळकळीच्या हजारों ऐकिव उपदेशांपेक्षां आत्मप्रत्ययच शेवटीं परिणामकारक ठरतो. चला, आपणा सर्वांनाही तिच्या मागोमाग गेलं पाहिजे. दुली, फाजिल चौकसपणाबद्दल मी तुला दोष देत असें पण त्याच दोषाबद्दल आज तुला शाबासकी द्यावी लागणार. चला.

दुलारी. ( स्वगत ) आहेंच मी तशी हुषार! नाहींतर ताई! अं:!!

( जातात. )

---

प्रवेश ५ वा.

स्थळ—मठ.

( ममता व पुट्टु पंडित )

ममता. आहांत ना तुम्हीं कबूल ?

पुट्टू. हें काय सूत्र ? ही धिंडका कां लागली माझ्यामागं ? अग ममते, तूं अगदीं मूर्ख आहेस.

ममता. म्हणूनच ना मी तुमच्या गळीं पडतं. आपलीं सारींजणं मठाजवळपास राहूं. होय म्हणा हो !

पुट्टू. होय म्हणा काय ? या जन्माच्या गाठी आहेत. ही कांहीं लग्नसोहळ्यांतली पदराची गाठ नव्हे कीं एका सवाष्णबाईनं आपल्या नवऱ्याचं नाव घेतांच सुटेल.

ममता. असं काय बरं ? एवढी कराच सही या अर्जावर. हें पहा, मी फाउन्टन पेनच आणलं आहे.



श्री—संन्याशानांही खालीं पाहायला लावण्याची ही सुसंधि साध. पान ११०

The Manoranjan Press, Bombay.



डेव्हिड—अरेरे ! शेवटीं हिनं मला फसवलं ! पान १२०

**पुट्टू.** तूंच कर सही. हा काय त्रास ? छेः छेः, पुरा कली आला खरा. या बायका आतां पुरुषांना अगदींच भारी होत चालल्या. अग वेडपे, मी केवढा मोठा दशग्रंथी ब्राह्मण आहें तें तुला माहित आहे ?

**ममता.** माहित आहे ह्मणूनच तुह्मांला सही करायला सांगतें आहें. इतक्या साऱ्या मंडळींचीं लग्नं व्हायचीं आणि तुह्मीं ब्रह्मचारी राहायचं ? हें कुणाला कसं पाहवेल ? मी कबुल आहें, मग तुह्मांला कबुल करायला काय हरकत आहे ? खरंच मी कबुल आहें.

**पुट्टू.** अग पण मी कुठं कबुल आहें ?

**ममता.** ह्याच आतां कबुली. असं काय बरं ? मालन, डेव्हिडराव, गुलेलूसाहेब, सारे हिंदु होणार आणि मीच तेवढी कां मागं राहूं ? तें कांहीं नाहीं. तुम्हीं कबुली दिलीच पाहिजे.

**पुट्टू.** कबुली दिलीच पाहिजे म्हणे ? काय तुझी सत्ता आहे वाटतं माझ्यावर ?

**ममता.** असे नाहीं तुम्हीं येणार वठणीवर. आतां चौदावं रत्न दाखवतें, मग समजेल.

**पुट्टू.** तुझ्यासारखं रत्न पदरीं बांधून घेण्यापेक्षां मी चौदावं रत्न देखील पत्करीन.

**ममता.** पण चवथं रत्नच बाहेर काढलं तर ?

**पुट्टू.** चवथं रत्न ? कुठलं बरं चवथं रत्न ? लक्ष्मीः कौस्तुभ पारिजातक सुरा—अग सटवे !

**ममता.** आतां कसं ? तुमचं मद्यमांस खाणं सर्वांनीं दडपून टाकलं तरी मी आणीन चव्हाट्यावर. बोला, आतां करतां कीं नाहीं सही ?

**पुट्टू.** आणि मी कबूल झालों—तर ? मग नाहींना यातलं कांहीं बाहेर फोडायचीस ?

**ममता.** अहो, हिंदू झाल्यावर मी असं करीन ? हिंदूंच्या बायका आपल्या नवऱ्याची अब्रू केव्हांही चव्हाट्यावर आणित नसतात.

**पुट्टू.** ( स्वगत ) आतां काय करावं ? हें बाहेर आलं तर प्रायश्चित्त घ्यावं लागेल. छे: छेः, माझ्यासारख्या विद्वान् ब्राह्मणावर प्रायश्चिताचा प्रसंग ! अब्रह्मण्यं ! प्रायाश्चित घेण्यापेक्षां बायको पत्करून मोठेपणा घेतलेला काय वाईट ? वर्तमानपत्रांतून नावासकट फोटो तरी येईल ! बाकी दिसण्यांत ही बरी आहे. ब्राह्मणाच्या कुळांतली आहे. चांगली सशक्त आहे. हुषार दिसते; आणि शिवाय ममता आहे. ( उघड ) ममते, तुझी दीनवाणी स्थिति पाहून माझं हृदय विदीर्ण होत आहे. ममत, दे तो कागद इकडे. तुझ्या केविलवाण्या स्थितीकडे पाहतांना माझे डोळे पाण्यानं भरून येत आहेत, त्यामुळं या इंग्रजी अर्जावरची सहीची जागा मला दिसत नाहीं. कुठं करूं सही ? ( ती जागा दाखविते. सही करतो. ) आतां कांहीं बोलायचं नाहीं बरं.

**ममता.** बोलायची गोष्टच नको. आणलंतच तसलं कांहीं तर गुपचुप रांधूनसुद्धां वाढीन.

**पुट्टू.** अरेरे ! शेवटीं स्मृतिच्या प्रमाणाला बाध येणार. ही आल्यानं माझं घर शून्य होणार. माझ्या घरचे देव जाणार. आमचं हिंदुधर्मशास्त्र काय म्हणतं कीं ' यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता ' जिथं बायकांच्या नावानं पूज्य झालं आहे, तिथंच देवता रममाण होतात. ' अरेरे ! आतां देवता माझ्या देवघरांतून जाणार.

**ममता.** त्या रिकाम्या देव्हाऱ्यांत आतां ममतेची स्थापना करा. चला, मी आहें कबूल.

( जातात. )

---

## प्रवेश सहावा.

( ख्रिस्ती कबरस्तानांत डेव्हिड )

**डेव्हिड.** पूर्ण समाधानासाठीं संन्यासाची कां आवश्यकता असते, तें आतां मला कळलं. सर्वत्यागी होण्यांत किती आनंद असता हा !— बाबांच्या थडग्याच्या या शेवटच्या दर्शनानं मन किती प्रसन्न झालं !—

पद–चाल ( बरसात बरसती है )

खरी शात विरक्ती ये । सुखी मी परी मरुं पाहें । देहा केंवि
जीव साहे ॥ धृ ॥ चिन्हिं मोहुनियां जे करी सशंका । आतां
न ये कुशंका ॥ १ ॥

डेव्हिडचा अवतार आज संपला. उद्यां माझं धर्मांतर होणार होतं, पण आजच आतां माझं देहांतर होणार! किती चमत्कारिक मरण येणार हें! वैतरणी खरी कीं पुनरुत्थान खरं? दोन धर्मांच्या संधीवर येणाऱ्या या मृत्यूमुळं माझ्या आत्म्याला कुठली गति मिळणार? किंवा कसलीच गति न मिळतां तो नुसता तळपत राहणार? जीवनाच्या या पडद्यापलीकडे काय आहे, हें आतां मला स्पष्ट दिसून येईल. भिन्न धर्मसमजुतींच्या भ्रमानं कातावलेली बुद्धि आतां संचाररहित होऊन जाईल. सर्व संशय फिटतील, पण एका संशयाचं काय? उद्यां सकाळीं माझं पत्र मिळतांच किशोरीला काय वाटेल? गुरुजी तिला माझं पत्र दाखवितील का? लाज सोडून मी माझ्या प्रेमाचं पाप लेखी कबूल करून प्रायश्चित घेतलं खरं; पण माझ्या मनापासून देखील चोरून ठेवलेली ही कबुली वाचून किशोरीला काय वाटेल? पौर्णिमेच्या चंद्रासारख्या तिच्या मनःप्रकाशाला राहूसारखा मी ग्रहण लावणार? केवढा हतभागी मी? स्वतः दुःखी तो दुःखी; पण माझ्या सहवासानं आनंदाच्या भरतीला देखील दुःखाचा ओहोट लावतों. आनंद? कुठं आहे आनंद! हे रडवं जग हसविणारा आनंद! कुठं आहे आनंद! प्रेमांत! प्रेमाचं माहेरघर म्हणजे अश्रूंचं साम्राज्य! आणि अश्रू म्हणजे दुःखाच्या वज्राघातानं हृदयरूपी मेघांचा, नयनाकाशांतून कोसळणारा बिनरंगी रक्ताचा पाऊस! पण आनंदाश्रू म्हणजे काय? विश्वांतील असंख्य धर्मांच्या ईश्वरा, आनंदाश्रू मला मिळतील का रे? कविकल्पनेच्या इंद्रधनुषी वावटळींतच आनंदाश्रू असतात कीं, खरेच कुणीं ते अनुभविले आहेत! बाबा, बाबा, तुम्हांला कधीं आनंदाश्रू आले होते का हो! धर्मांतराच्या पश्चात्तापानं केव्हां केव्हां तुम्हीं आसवं गाळित होतां, आवडत्या महाराष्ट्राच्या स्मरणानं तुमच्या पापण्या ओल्या होत होत्या, आवडत्या महाराष्ट्रांतल्या आवडत्या तुकारामाचे अभंग म्हणतांना डोळ्यांच्या गंगोत्रीचा झरा हृदयींच्या जळत्या घांटावर मणकर्णिकेची

काशीयात्रा करीत होता. ह्यांतले आनंदाश्रू कुठले ? बाबा, तुमची झोंप इतकी गाढ नसे. माझी हांक तुम्हांला ऐकूं येत नाहीं ना ! धर्मांतराचा धोंडा छातीवर पडल्यानं तुम्हीं जमिनीला जखडून गेलांत वाटतं ? बाबा, असं काय बरं ! मी तो देवदत्त. डेव्हिड नव्हें मीं ! माझं परावर्तन झालं. कळलं ना तुम्हांला ! उठा, बाबा, उठा. मला तिकडेच यायचं आहे. या रांगत्या देवदत्ताला दुडदुड धांवत स्वर्गाचा किनारा गांठायला तुमच्या-शिवाय कोण हात देईल ! तुम्हीं एकदां हा रस्ता पाहिला आहे. मी ही पाहिला असेल; पण अगदीं अजाणपणीं पाहिल्यामुळं आता काहींच आठवत नाहीं. मग देतांना मला हात ! तुमचा आवडता अभंग म्हणू का ! मग तरी उठाल ? ऐका अं !

### अभंग

बारे पांडुरंगा केव्हां भेट देशी । झालों मी परदेशी तुझ्याविण ॥

परदेशी ? अरेरे ! मी परदेशी—पांडुरंगा, हिंदुस्थानांत जन्म घेऊन तुझ्या—अभावीं मी परदेशी !—( पुढं म्हणतो. )

ओंवाळावी काया चरणावरोनी । केव्हां चक्रपाणी भेटशील ॥

तुका म्हणे माझी पुरवावी आवडी । वेगें घालीं उडी नारायणा ॥ १ ॥

वेगें घालीं उडी नारायणा. कुठला उडी घालणार तो ? महाराष्ट्राचा तुका म्हणत असे कीं, 'माझ्या लेखीं देव मेला, असो त्याला असेल.' बाबा, देव मेला बरं. आम्हीं त्याचीं मुलं ना ? आमच्याशिवाय दुसरं कोण आहे त्या बिचाऱ्याला ? उठा, देवाला आपण जिवंत करूं. 'आम्हीं विठ्ठलाचे दूत, यम आणूं शरणागत.' यमाच्या पाशांतून देवाला सोडवूं या. उठा. किशोरीला हांक मारूं ? किशोरीला ?—( दचकून ) अरेरे ! स्वप्नच सारं ! स्वप्ना, आतां स्वप्न हो. भ्रमाच्या भ्रांतीनं मला भुलवूं नकोस. विसरीच्या विसरभुलीनं आत्महत्येची विस्मृती पाडूं नकोस. बाबा, उठा आतां मीही आलोंच. हें हिंदुत्वाचं वस्त्र—माझ्या आवडत्या महाराष्ट्राचं हें आवडतं उपरणं मला आतां गळय भावती गुंडाळूं दे. महाराष्ट्राचं वस्त्र पांघरून आतां स्वर्गाचा मार्ग गाठूं दे. शिवाजीच्या महाराष्ट्रा, तुझं दर्शन आतां स्वर्गांत. तुकारामाच्या महाराष्ट्रा, तुझं भजन आतां स्वर्गांत. बजाजी

निंबाळकरच्या महाराष्ट्रा, तुझं परावर्तन आतां स्वर्गांत. ( उपरणं झाडाला बांधतो. ) डेव्हिडच्या जीवनाचा हा मिणमिणता दिवा मालवणार. आतां कुठल्या स्नेहाचं स्मरण करूं? कसलं भय ? लाजेला गळफास लागल्यावर जळत्या जगाच्या धगधगाटालासुद्धां आतां मी भीणार नाहीं. किशोरी-किशोरी-

पद—चाल. ( कटत नाहीं. )

मरण दिनि मजला करिं सुखें सफल काम । श्रवणासि तनुनाशिं
वचन तव हरिनाम ॥ ध्रु ॥ हरिल मम अघनगा । नयनिंची त्रिपथगा ।
अधर तव तुलसिदल सुलभ करि सुरधाम ॥ १ ॥

किशोरी-किशोरी—

**किशोरी.** ( धांवत येऊन ) काय आज्ञा आहे ?

**डेव्हिड.** गळफासाशिवाय स्वर्ग गांठला का ? स्वर्गीच्या देवते, तूं कुठून बोलत आहेस ?

**किशोरी.** डोळे उघडून पहा. तुमच्या हृदयांतली किशोरी बाहेर येऊन उभी राहिली आहे.

**डेव्हिड.** डोळे उघडूं ? छेः, नाहीं. हा आनंदाचा भ्रम नाहींसा होईल. माझ्या हृदयाची वज्रकपाटं फोडून बाहेर येऊन उभी राहणारी किशोरी दगा देईल.

**किशोरी.** हृदयांतली असो किंवा बाहेरची असो—किशोरी दगाबाज नाहीं. किशोरी दगाबाज असती तर तिनं आपलं हृदय पारखण्यासाठीं डेव्हिडनां आत्महत्त्येपर्यंत येऊं दिलं नसतं. डेव्हिड, डोळे उघडा.

**डेव्हिड.** किशोरी ! खरीच किशोरी ! अरेरे ! मृत्यु देखील माझ्या परावर्तनाला आड येतो ! किशोरी, घरीं जा. हा देखावा तुझ्यानं पाहवणार नाहीं.

**किशोरी.** खरोखरच नाहीं; आणि म्हणूनच मी येथून हालणार नाहीं. डेव्हिड, हा काय अविचार चालला आहे ?

**डेव्हिड.** ही विचाराची परमावधी आहे. किशोरी, जगण्याचा मला काय अधिकार आहे ? मला धर्म नाहीं, आईबाप नाहींत, घरदार नाहीं,

स्नेहीसोबती नाहींत, प्रेमाच्या जीवनाचा एक कण ठेवायला देखील मला कुठं जागा नाहीं. जगानं माझ्याशीं फारखत केलं. आतां मी जगूं तरी कुणासाठीं ?

**किशोरी.** माझ्या शब्दासाठीं. डेव्हिड, सुशिक्षित माणसाच्या नांवाला कलंक लावणारा हा अत्याचार तुम्हीं कां करित होतां ?

**डेव्हिड.** मी एकदां सांगितलं ना ? किशोरीदेवी, माझ्या या मताला कुणी वेडेपणा म्हणतील. मी त्यांना दोष देणार नाहीं. जें माझ्या बाबांनीं अजाणपणें घालविलं आणि जें परत मिळविण्याविषयीं त्यांनी मरतांना माझ्या-कडून शपथ घेववली, तें माझं हरपलेलं ब्राम्हण्य मिळण्याची आशा पूर्णपणें नाहींशी झाल्यावर मी जगूं कशाला ?—थांबा, तुम्हीं काय म्हणणार तें मी समजलों. पण जी भावना एकदां बाणली, ती आतां बदलणं अशक्य आहे. नुसत्या धर्मसमजुतीच्या धुक्यानं धर्मोदयाच्या प्रकाशाची माझी उणीव भरून निघणार नाहीं.

**किशोरी.** तुमचं परावर्तन करायचं धर्ममंडळानं कबूल केलं ना ?

**डेव्हिड.** पण कोणत्या अटीवर ? किती विलक्षण अट ती ! किशोरी देवी, हा देह मी आतां टाकणार. तो विचार आतां बदलणं अशक्य आहे. तुम्हीं कां उगीच आलांत ? मी इथंच आहें, हें तुम्हांला कसं कळलं ?

**किशोरी.** कसंही कळेना. मी इथं आलें, तुमची ही स्थिति पाहिली. तुमचा निश्चय कळला. आतां तुम्हांला सोडून कशी जाऊं ? डेव्हिड—

**डेव्हिड.** हें काय किशोरी देवी, मला मघांपासून तुम्हीं डेव्हिड कां म्हणतां ?

**किशोरी.** जिव्हाळ्याची जाणीव उत्पन्न झाली म्हणजे परकेपणाचा प्रपंच नाहींसा होतो. डेव्हिड, माझ्या शब्दासाठीं—

**डेव्हिड.** मरण्यापूर्वी मला हे शब्द ऐकायला मिळाले. केवढा मी भाग्यवान् !

**किशोरी.** भाग्यवंताच्या भाग्याचा वाटा आपल्यालाही मिळावा, असं कुणा भाग्यहीनाला वाटणार नाहीं ? डेव्हिड, हा आत्महत्येचा विचार सोडा.

**डेव्हिड.** कां म्हणून ? देवी, इकडे पहा. या मातीच्या ठिसुळ ढेंकळाखालीं माझ्या बाबांच्या अस्थि सडत पडल्या आहेत. थडगं उकरणं हा गुन्हा नसता तर त्या कोरड्या हाडांना मी माझ्या डोळींच्या गंगेनं भिजवून टाकलं असतं. या रूक्ष भूमींतील ओसाड दगडमाती माझ्या अश्रूंचीं शिंपणीं घालून एका क्षणांत फुलत्या हिरवळीनं फुलवून टाकली असती. देवी, तिकडे पहा. त्या वेली पहा, तीं कोमल पुष्पं पहा, ती संमार्जित भूमी पहा, काळ्याकुट्ट हृदयांच्या हाडांवर झांकण घालून फुक्या स्तुतीनं काळवंडलेले ते पांढरे शुभ्र दगडी तक्ते पहा ! काळ्या देहाचीं पांढरीं हाडं ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली तरी या उकिरड्यांतच सडत रहाणार. त्या नंदनवनांतली जागा कुणासाठीं आहे ? आमच्यासाठीं तर खास नव्हे. म्हणूनच देवी, मला ब्राह्मण्याच्या अभावीं मरण कवटाळण्याची लालसा वाटली.

**किशोरी.** डेव्हिड, ब्राह्मण्य मिळण्याची खात्री दिल्यावर तुम्हीं आत्महत्येचा विचार रद्द कराल का ?

**डेव्हिड.** धर्ममंडळाची अट कशी पुरी होणार ? नका—मला खोटी आशा देऊं नका.

**किशोरी.** खोटी आशा नव्हे. तुमचं ब्राह्मण्य तुम्हांला मिळालं असंच समजा.

**डेव्हिड.** असं कसं समजूं ? छेः, ती गोष्ट आतां अशक्य आहे. धर्ममंडळाचा ठराव कां फिरेल ?

**किशोरी** तें तुम्हांला मग सांगेन. पण आधीं मला वचन द्या, माझ्या हातावर आपला हात देऊन, तुमच्या वडिलांच्या समाधीला साक्षी ठेवून, आत्महत्या करणार नाहीं असं मला वचन द्या. नको तो मेला दुष्ट विचार. या—पुढं या. हात पुढं करा. ही मी या समाधीच्या एका बाजूला रहातें. हं-तिथूनच हात पुढं करा. असे कांचरूं नका. करा ना तो हात पुढं. ह ठेवा तो हात या हातावर. अस्सं—आतां तोंडचं वचन उच्चारा पाहूं.

**डेव्हिड.** या बाबांच्या अस्थि साक्ष—ब्राह्मण्य मिळत असेल तर मी आत्महत्त्या करणार नाहीं.

**किशोरी.** ( त्याचा हात घट्ट धरून ) हं—थांबा. हात मागं घेऊं नका. असाच आतां हा माझा हात धरा. ऐका, देवदत्त, ऐका. या तुमच्या पित्याच्या अस्थि साक्ष—ही किशोरी आपल्या पित्याच्या संमतीनं आपला हात तुमच्या हातांत देऊन वर देव आणि खालीं हा ब्राह्मण—यांच्या साक्षीनं या क्षणापासून तुमची धर्मपत्नी झाली. जय भगवन् ! ( मूर्च्छित होते. डेव्हिड सांवरतो. )

**डेव्हिड.** किशोरी—किशोरी, सावध हो. अरेरे, शेवटीं हिनं मला फसवलं. हिच्या पूर्वीच्या वृत्तीनं कसा चकलों मी ? किशोरी, -

**किशोरी.** देवदत्त, या अभिमानिनीला तुम्हीं आपल्या हृदयाचा आसरा दिलात ? क्षमा करा, माझ्या आंधळ्या अभिमानाची मला क्षमा करा.

**डेव्हिड.** ऊठ किशोरी. डेव्हिड असो किंवा देवदत्त असो. या हृदयांत राहणारा जीव दीन असला तरी दुबळा नाहीं. किशोरी, दिलेलं वचन मी पाळीन. पण तुझं पाणिग्रहण ? नाहीं किशोरी, तुझं पाणिग्रहण करण्याची माझी योग्यता नाहीं.

**किशोरी.** हा अपात्र हात मी तुम्हांला अर्पण केला आहे. तुम्हीं त्याची याचना केव्हांही केली नाहीं, हें मी विसरलें नाहीं.

**डेव्हिड.** माझं पत्र तूं उद्यां पाहिलं असतंस तर -

**किशोरी.** तें पत्र मी पाहिलं. ( दोघेंही स्तब्ध राहतात ) तें पत्र मी पाहिलं आणि त्याचक्षणीं हा अभिमानी जीव मी या पायावरून कुरवंडून टाकला.

**डेव्हिड.** फसलों. भवितव्यतेनं शेवटीं मला दगा दिला.

**किशोरी.** नाहीं. तुम्हीं फसणार होतां. पण ( थडग्याकडे बोट दाखवून ) या पुण्यपुरुषाच्या जागत्या ज्योतीनं माझ्या डोळ्यावरचं मोहपटल नाहींसं केलं. आणि तुम्हाला पापाच्या फांसावरून खालीं उतरवलं.

**डेव्हिड.** किशोरी, अशक्य ! माझं मन सांगतं, अशक्य ! तुझ्या अलौकिक स्वार्थत्यागानं मला माझं ब्राह्मण्य मिळेल खरं पण स्वार्थाच्या संपादणीनं ब्राह्मण होण्यापेक्षां जन्मोजन्म पतित राहणंदेखील मला आनंद-

दायक वाटेल. इतर कुणा ब्राह्मणकुमारीनं आपला हात मला दिला असता तर त्याचा स्वीकार करून मी आनंदानं ब्राह्मण झालों असतों. पण माझं चोरटं प्रेम मी विसरलों नाहीं. नाहीं--किशोरी, तुझं पाणिग्रहण मला अशक्य आहे. तुझ्या पाणिग्रहणानं मी आपमतलबी, बेइमान, ढोंगी, स्वार्थसाधू ठरेन. नाहीं-तुझं पाणिग्रहण मला अनुचित आहे.

**किशोरी.** देवदत्त, हें माझं हृदय चिरून पहा. स्वार्थत्यागाच्या चितेवर धगधगणारं प्रेमाचं प्रेत तिथं तुमच्या नजरेला येईल. काव्यांतून ज्याला प्रेम म्हणतात त्या भावनेची होळी झाली. कर्तव्याची तीव्र जाणिव हेंच आतां माझं प्रेम. याच प्रेमाच्या संस्थापनेसाठीं आतां हा **संन्याशाचा संसार** आनंदानं थाटूं या. ईश्वरी तेजाच्या सुवर्णग्रंथीनं बांधलेल्या या हातांनीं आचार्यांना आतां नमस्कार करूं चला.

**डेव्हिड.** मला आतां ब्राह्मण्याची जरूरी नाहीं. निःसीम प्रेमाच्या अहेतुक जाणिवेनं ओथंबलेलं एक हृदय माझ्या दयेनं अश्रु ढाळित आहे, हें पाहूनच मी कृतार्थ झालों. जगांतल्या साऱ्या धर्मांना मी आतां आनंदानं पायांखालीं तुडवीन. नाहीं-मी या मोहाला बळी पडणार नाहीं. किशोरी, या तुझ्या अलौकिक उपकारांच्या ऋणानं मी आमरण-नव्हे जन्मोजन्मीं तुझा ऋणाईत राहिन. तुझ्या दिव्य देणगीचा स्वीकार करण्याचं धैर्य माझ्या अंगीं नाहीं, याची मला क्षमा कर. ( जातो. व बिंदु. व श्री. येतात.)

**किशोरी.** बाबा—बाबा—त्यांना थांबवून धरा. माझ्या पाणिग्रहणाचा त्यांनीं उपहास केला. आतां मी काय करूं ?

**बिंदुमाधव.** धीर धर. आचार्यांनींच आतां डेव्हिडची समजूत घातली पाहिजे.

**श्री.** गुरूजी, आतां संन्यासी कोण ? संसाराला दूर लोटून मी संन्यासी म्हणवितों, पण संन्यासाच्या त्यागानं संसारी होण्याचं धाडस करूं पाहणाऱ्या एका संन्यासिनीचा त्याग, स्वतःच्या स्वार्थासकट ज्यानं झुगारून दिला तो संन्यासी कीं संसारी ?

**बिंदुमाधव.** माझ्या मुलांनो, तुम्हां सर्वांचाच मला अभिमान वाटतो. संसाराच्या त्यागानं तूं श्रेष्ठ. संन्यासाच्या त्यागानं किशोरी श्रेष्ठ

आणि संन्यास आणि संसार या दोहोंच्याही त्यागानं डेव्हिड—नव्हे देवदत्त—माझा लाडका जामात, सर्वांहूनही श्रेष्ठ ठरला.

**श्री.** चल किशोरी, आपण आतां सर्व मिळून देवदत्ताची विनवणी करूं आणि त्यागाच्या त्यागाला सहज लीलेनं झुगारणाऱ्या त्या वीरपुरुषाची समजूत घालूं. त्याच्या परावर्तनावर इतर सर्व परावर्तनं अवलंबून राहिलीं आहेत. अलौकिक आत्मत्यागाच्या हवनानं जगत्कार्याची ध्वजा फडकावण्याचा मान घेण्यासाठीं आतां देवदत्ताला तुझं पाणिग्रहण करणं भाग आहे. तसं होण्यासाठीं हिंदूंच्या शंकराचार्यांचा हा प्रतिनिधी त्या खिस्ती महात्म्याच्या पायावर हें संन्यासी मस्तक ठेवण्यालादेखील तयार आहे.

( जातात. )

---

### प्रवेश ७ था.

### स्थळ—देवघर.

( दुलारी व सुब्रह्मण्य. )

**सुब्रह्मण्य.** तूं नाचवशील तसं मला नाचलं पाहिजे खरं. आतां तरी हा पोषाख तुझ्या मनासारखा झाला ना ?

**दुलारी.** मुळींच नाहीं. वरच्या फेट्याशिवाय या आमच्या पंजाबी पोषाखाला मुळींच शोभा नाहीं.

**सुब्रह्मण्य.** ठीक आहे. आतां हा पहा फेटा बांधतों. ( तो फेटा बांधतो. ती हंसू लागते. )

**दुलारी.** जिव्हाचापल्याचं कितीही शौर्य दाखिवलं तरी खरा वीरपुरुष दिसण्यासाठीं मद्रदेशीयाला पंजाब्याच्याच तोंडाकडे पाहावं लागेल.

**सुब्रह्मण्य.** मग मी कुठं नाकबूल आहें. चोवीस तास तुझ्या तोंडाकडे पाहत राहायला मी तयार आहें.

**दुलारी.** बायकांच्या तोंडाकडे पाहत राहिल्यानं कांहीं पुरुषाच्या अंगीं शौर्य येत नाहीं.

**सुब्रह्मण्य.** पण बायकांच्या तोंडाकडे पाहिल्यामुळंच पुष्कळशा शूरांना शौर्यानं माळ घातली आहे.

**दुलारी.** त्यासाठीं आधीं त्या बायकोनं त्याला माळ घालावी लागते.

**सुब्रह्मण्य.** मग आतां उशीर कां? तुझ्या अनुकरणानं मी परंपरा झुगारून दिली आणि आतां मला माळ घालण्यासाठीं मात्र तूं परंपरेंतल्या मुहूर्तांची वाट पाहत राहणार? तें कांहीं नाहीं. हा फेटा तूंच मला बांधून दिला पाहिजे. आणि अशा रितीनं माझं मस्तक तुझ्या ताब्यांत जातांच माझ्या गळ्याला तुझ्या करमालेचा विळखा पडला पाहिजे. (ती फेटा आणून त्याच्या डोक्यावर ठेविते.)

**दुलारी.** पडलं ना आतां डोकीला झांकण?

**सुब्रह्मण्य.** हें झांकण मजबूत व्हायला तुझ्या करपाशाचीच तेवढी जरुरी आहे. आतां का लाजतेस? दुलारी आणि लाज? साऱ्या जगाला नाचविणारी दुलारी आपल्या वल्लभालाच लाजूं लागली, असं कुणाला शपथ घेऊन सांगितलं तरी खरं वाटणार नाहीं. आणूं का गुलेलू-साहेबाला बोलावून?

**दुलारी.** काय फसला बिचारा! कुणाला कांहींही वाटो. मला अशारीतीनं देखील परावर्तनं घडवून आणावींशीं वाटतात. त्यांच्याच भाषेंत बोलायचं म्हणजे 'बहकलेलीं वासरें पुनः गोठ्यांत यावीं.' मग तीं कशींही का येईनात.

**सुब्रह्मण्य.** वासरांचं मला काय होय? पण या बहकलेल्या—

**दुलारी.** बैलाला म्हणायचं नाहीं बरं. मग मी अगदींच गरीब गाय ठरेन. मला कुणी गरीब गाय म्हटलं तर माझा अपमान केलासं वाटतं.

**सुब्रह्मण्य.** मलाही तसंच वाटतं. पण तूं गरीब गाय नाहींस हें ठरायला प्रेमाच्या कठोरपणाचा गळफास घालून आधीं या सुब्रह्मण्याचा प्राण घे.

**दुलारी.** असा प्राण कंठीं आल्याशिवाय कंठाला मिठी घालून हातीं काय लाभणार?

**सुब्रह्मण्य.** तर मग आतां उशीर कां लावतेस? हे तुझे हात असे या कंठाभोवती घालून—

**गुलेल्लू.** ( हिंदुवेषांत प्रवेश करून ) अं: ! हा काय चमत्कार? दुलारी, हें काय? आतां मी हिंदु झालों. पहा, हें माझें यज्ञोपवीत पहा. माझ्या कंठींचें हें यज्ञोपवीत तुझ्या करपल्लवाच्या गांठीशिवाय अपुरें आहे.

**दुलारी.** तुमच्या ब्रह्मग्रंथीला लग्नाच्या गांठीची जोड द्यायला मालन नव्हे—मालिनीबाई तयार आहेत. काय करूं, यशवंतराव, माझ्या बाबांच्या आज्ञेनं मला आतां यांनाच माळ घालावी लागणार. सान्याच सवलती एकदम द्यायला धर्ममंडळ तयार नाहीं. त्यांनीं तुम्हाला क्षत्रिय ठरविलं आहे.

**सुब्रह्मण्य.** यशवंतराव, असे नाराज होऊं नका. मालिनीबाई तुमच्या पत्नी व्हायला फारच अनुरूप आहेत.

**गुलेल्लू.** पण ती कुठं कबूल आहे?

**मालन.** ( प्रवेश करून ) दुलारीबाई. आतां मी काय करूं? आचार्यांच्या विनंतीवरून डेव्हिडराव—नव्हे देवदत्त किशोरीच्या पाणिग्रहणाला कबूल झाले.

**सुब्रह्मण्य.** काय म्हणतेस? आचार्यांनीं देवदत्तांची विनवणी केली?

**मालन.** नुसती विनवणीच काय? भरसभेंत डेव्हिडरावांच्या पायावर मस्तक ठेवून त्यांनीं किशोरीच्या पाणिग्रहणाची भिक्षा मागितली.

**सुब्रह्मण्य.** धन्य त्यागराज! दुलारी, आचार्यपदाला त्यागराजांचेंच मस्तक अगदीं योग्य आहे यांत शंका नाहीं.

**गुलेल्लू.** पण आतां मी काय करूं?
**मालन.** पण आतां मी काय करूं?

**दुलारी.** परस्परांचं पाणिग्रहण करा.

**सुब्रह्मण्य.** यशवंतराव, तुमचा हात इकडे द्या. मालिनीबाई, या माझ्या यशवंत यशवंताचा हात धरून आतां सुखाचा संसार करा.

**[दुला]री.** आतां एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं. चला, असेच [हा]त घालून आमच्या घरीं चला. कन्यादानाची तयारी करून बाबा तुमच्या येण्याची वाट पहात आहेत.

---

**सुब्रह्मण्य.** या ब्राह्मणाला आधीं नमस्कार करा. ( तीं नमस्कार करतात) अष्टपुत्रा सौभाग्यवती भव. आतां या ब्राह्मणाला दक्षिणा ?

**गुलेल्लू.** दक्षिणा काय देऊं ?

**सुब्रह्मण्य.** दुलारीच्या मागल्या चाळ्यांचा आतां उच्चार सुद्धां करायचा नाहीं, एवढीच दक्षिणा मला पुरे. चला ( गुलेल्लू व मालन जातात. )

**दुलारी.** आतां ?

**सुब्रह्मण्य.** आतां काय ? लग्नमंडप आपली वाट पहात आहे. या जोडप्यांचंच अनुकरण करून असे हातांत हात घालून गुरूजीं समोर हजर होऊं.

**दुलारी.** आधीं मला एक वचन द्या. काय तें आधीं नाहीं सांगणार. मुकाट्यानं माझी अट धर्ममंडळाकडून वदवलीत तशीच हीही कबूली द्या. किशोरीताईचं लग्न झालं नसतं तर आपण अशींच रडत राहिलों असतों कीं नाहीं ? आधीं तिच्या ऋणांतून उतराई झालं पाहिजे.

**सुब्रह्मण्य.** हं समजलों. अग, मला आतां कुठं हवं आहे हें सर्वाधिकारित्व ! तेंच देऊन टाकूं तुझ्या ताईच्या नवऱ्याला. मग तर झालें ना ! तूं आणि मी. यांतच माझा सर्व अधिकारयोग आला. अहाहा ! धन्य धन्य हा संसार ! ( जातात. )

---

### प्रवेश आठवा.

### स्थळ—नूतन मठ.

( बिंदुमाधव आणि श्री. )

**श्री.** केवढा भाग्याचा दिवस उगवला ! परंपरेच्या घनदाट अमावास्येचा काळाकुट्ट अंधकार दूर सारून नवजीवनाचा देदिप्यमान सूर्य आज क्षितीजावर झळकूं लागला—

पद. चाल—( खेल रहि होरी. )

कालतम गेला । दशदिशा दिधला उजाळा । दिपविला ॥ धृ० ॥
कनकगुण जनांचा । परिस मृदु मनाचा । सुवर्णाभरणयुत झाला ॥ १ ॥

**बिंदुमाधव.** हे वृद्ध नेत्र या आनंदाच्या देखाव्यानं आज तरुण होऊं पहात आहेत. कुणाचं वर्णन कसं करूं ? त्यागाच्या कसोटींत प्रत्येकानं एवढी चढाओढ चालविली आहे कीं, त्यांत सारेच पहिले आले. पण त्यागराज, एवढ्यावर थांबलं नाहीं. हा इंडियन उइट्नेसचा अंक पहा. दीड कोटीचं अजस्त्र भांडवल उभारून मेथॉडिस्ट मिशन सारं हिंदुस्थान ख्रिस्ती करण्याकरितां चाल करून येत आहे.

**श्री.** त्याची भीति मला वाटत नाहीं. आमच्या शंकर मिशनची स्थापना झाल्याची बातमी जाहिर होतांच-या पहा, लाखों रुपयांच्या देणग्या दिल्याबद्दल मुंबईच्या सर्वधर्मीय धनिकांच्या तारा आल्या. पैसे मिळतील, पण गुरुजी, माणसंच मिळणं मोठं कठिण आहे. पैसा म्हणजे एक गुलाम आहे. फटके मारतांच हात जोडून पुढं उभा राहतो. पैशाची मला पर्वा वाटत नाहीं. कर्तव्यासाठीं स्वार्थत्यागाला सिद्ध झालेल्या एका नेकीच्या माणसाशीं कुबेराची अपार संपत्तिदेखील मातीमोल ठरेल. पण हीं माणसं कुठं मिळणार ?

**बिंदुमाधव.** तींही मिळतील. नवी पिढी इतकी अनुदार नाहीं. अजून अज्ञातावस्थेंत असलेली तरुण पिढी आपल्या जाज्वल्य कर्तव्यदक्षतेनं साऱ्या जगाला दिपवून टाकित असल्याचं पाहायला त्यागराज, या वृद्ध नेत्रांत आतां पुरेसं तेज राहिलं नाहीं. ईश्वर करो आणि ती नवी पिढी तुला साहाय्यक होवो.

**श्री.** तथास्तु. गुरुजी, हिंदुधर्माच्या वाटेंतले काटे आतां दूर झाले. शंकराचार्यांच्या मठाचा तुरुंग कोसळला जाऊन फलपुष्पित लतावृक्षांचं निसर्गरमणीय असं हें उद्यान बनलं, कडीकुलपांचीं दारं कोसळून पडलीं, भिंतीचं व्यवधान नाहींसं झालं, सिंहासनाचा उंचपणा जमिनदोस्त झाला, मुकुटाचा धोंडा हवेंत उडाला, भालदार चोपदारांची ओरड बंद झाली, भर दिवसा पाजळलेली अभिमानाची दिवटी मालवली, वैभवाचा शृंगार

सजविणारे हत्ती घोडे देखील बंधमुक्त होऊन स्वैरसंचार करूं लागले. आकाशाच्या चांदव्याखालीं चमकणारं भूमातेच्या कडेवरचं हें उघडं मैदान आतां बूटजोड्यांनादेखील प्रतिबंध करणार नाहीं. या शून्याच्या शून्य मंदिरांत प्रणवाची निराकार मूर्ती विराजमान झाली. पायींच्या पादुका देव्हाऱ्यांतल्या देवता बनल्या. पावलांची देवळं उभारतांच मस्तकाचा अभिमान नाहींसा झाला. जगद्धर्माचं हें मुक्तद्वार जगताचं मंगल करो, एवढाच गुरुजी, मला आशीर्वाद द्या.

**बिंदुमाधव.** तथास्तु—त्यागराज, केवढा आनंदाचा दिवस हा! किशोरीचा विवाह होऊन डेव्हिडचं परावर्तन होण्यासाठीं भारतवर्षाच्या शंकराचार्यांची मान आज प्रथमच वाकली गेली. हा अवर्णनीय प्रसंग पाहून शिवछत्रपतींच्या स्वर्गीच्या डोळयांना मानवलोकींच्या आनंदाश्रूंचा पाझर फुटला असेल. खरोखर, आचार्यांची आज्ञा पाळण्यासाठीं स्वतःच्या मताला बळी देणारा माझा जामात, शंकरमिशनचा कार्याध्यक्ष होण्याला पूर्णपणें पात्र आहे. गुलेल्लू यशवंतरावाच्या मदतीनं त्यानं या मिशनचं कार्य संपादावं आणि पूर्वानुभवाच्या जोरावर शंकरमिशन अजरामर करावं.

**श्री.** तशी सनद आतांच मंजूर करा. ( दंपत्यें येतात ) हा आला माझा संसार! विजयी भव—अष्टपुत्रा सौभाग्यवती भव. देवदत्त, तुमच्या स्वार्थत्यागानं आज केवढं कार्य झालं पहा. हजारों ख्रिस्ती आतां परावर्तनाचे अर्ज सादर करूं लागले आहेत.

**सुब्रह्मण्य.** माझा एक आहेर आहे. धर्ममंडळाच्या संमतीनं मी माझं सर्वाधिकारित्व देवदत्तांना अर्पण करतों. दुलारी, आतां किशोरीचं ऋण फिटलं ना?

**श्री.** देवदत्त, अधिकारत्यागानं संन्यासी झालेल्या सुब्रह्मण्यांच्या ह्या देणगीचा स्वीकार करा.

**देवदत्त.** जशी आज्ञा. सर्वांनींच मला ऋणायित केलं आहे. पण माझी एक याचना आहे. अकृत्रिम स्वार्थत्यागानं मला ब्राह्मणत्व देणारी ही देवता आमरण किशोरीच राहो, एवढा मला आशीर्वाद द्या.

श्री. तथास्तु. आतां हा समारंभ संपत आला.

सुब्रह्मण्य. थांबा-थांबा-एव्हांच कुणी जाऊं नका. या समारंभाला आलेल्या कुणा ख्रिस्त्याला पुनः वर्णाश्रमांत यायचं असेल तर त्यांना याच दिवशीं सरसहा दीक्षा देण्याची मला अनुज्ञा झाली आहे. कुणाचे अर्ज असतील तर आतांच सादर करा. आजची संधी बिनमोल आहे.

श्री. ठीक आहे. तसे अर्जही आतांच घ्या. देवदत्त, मी संसारी झालों असतों तर या विश्वाच्या अमर्याद प्रपंचापासून कुटुंबवत्सलतेनं माझी ताटातूट केली असती. आज माझा संसार किति अफाट झाला पहा! हा माझा संन्याशाचा संसार विषयीजनांच्या संकुचित प्रेममय संसाराला लाजविणार नाहीं.का?

डेव्हिड. खरं आहे. उगवत्या जगाला ही कबुली देणं भाग आहे. धन्य धन्य हा **संन्याशाचा संसार!**

---

**भरत-वाक्य.**

(जागिये गोपाललाल)

**या उठा त्यजा विलास। निकट करा ईश्वरास। आला सांत्वनास। जनमनःसविता।या॥ धृ०॥ विकसितमति स्वजन धाम। झालें कीं पूर्णकाम। आतां संन्यास नाम। देइ विजय। या॥ १॥**

**समाप्त.**



डेव्हिड—धन्य धन्य संन्याशाचा संसार. पान १२८

The Manoranjan Press Bombay.